जरी एकमेकाशीं बरोबर नाहींत, तरी पुष्कळ अंशीं प्रत्येक जुळतात. ह्मणून ही तुलना करण्यास ज्ञान व बुद्धि प्राणीमात्रांस आहे हें जगांत सिद्ध होतें. आतां बाल्यस्थितींत प्राणी प्रगट होऊन शेवटीं नष्ट होतों, असें आजमितीपर्यंत किती झालें व पुढें किती होतील, याचा हिशेब फक्त जगनियंत्यानींच करावा. इतरांस अशक्य आहे. बरें हें जरी मत्त मनोदेवतेनें सिद्ध केलें, तरी माझ्यापेक्षां बाबांनीं आपलें आयुष्य पुष्कळ खर्च केलें आहे, तर त्यांस अज्ञ ह्मणून काय उपयोग? (विचार करतो) ज्ञान संपादन करण्यास आणि सत्संगास गुरु पाहिजे, असा जगाचा जो समज अनुभवास येतो, त्यावरून तर निश्चय होतो कीं, विद्येवांचून प्राणी व्यर्थ होय. पशुपक्षांस, वाचा नाहीं, परंतु सृष्टिनियमाप्रमाणें प्रजा उत्पन्न होऊन जग हा आरसा लोकांच्या दृष्टीस पडतो. त्यांत आपलें स्वरूप पाहण्यास आहार, निद्रा, मैथुन वर्ज करून परमार्थ, परोपकार, हे मिथ्या आहेत असें जरी वाटतें, तरी बोलणाऱ्यास ज्ञानी, आणि अबोलत्यास बुद्धिहीन ह्मणणें अयोग्य होय. तर आतां आपणांस मुख्यत्वेंकरून आपले पूर्वज आपणांस जो उपदेश करितात, तोच खरा असें वाटून जर विद्या अवगत करून अनेक विद्वानांची संगत किंवा त्यांचे मनोदय अथवा अनेक ग्रंथावलोकनांनीं त्याचा ठसा अंतःकरणांत राहून जग ऋणी न होतां जगमान्य होईल, असें वाटण्यांस मूळ कारण जी विद्या, ती जर नसती, तर कोणीही कोणास न विचारता. अथवा भीड व मर्यादा न ठेवता. पाहिजे तसें वागण्यांस प्राणीमात्रास सुलभ पडलें असतें आणि स्वार्थ व परमार्थ ह्यांचा ऱ्हास होऊन मनुष्य आणि पशूं यांत भिन्न भेद न रहातां सजाती

झाली असती- अरे पण हे तर्क कांहीं उपयोगाचे नाहींत. मजवर अत्यंत प्रेम करणारी सुभाग्य जी राजकन्या, तिला पत्रद्वारेंच कळवावें. कारण, आतां मी लवकरच येईन किंवा तीही आपल्या बापाच्या राज्यांतच राहील असें नाहीं. कदाचित् सासरीं जाईल या गोष्टीचा नियम नाहीं (उठून व पत्र लिहून) आतां हें कोणाबरोबर पाठवावें बरें! अरे बरेंच स्मरण झालें. माझा तुळाजी चोपदार असतांना दुसरा मनुष्य पाहिजे कशाला? (बाहेर जाऊन) तुळाजी, ए तुळाजी, आंत ये पाहूं.

तुळा०–(अदबशीर करून) जी, काय शेटजी?

धन०–नीट जागा झालास काय?

तुळा०–होय, शेटजी.

धन०–तुळाजी, आतां बारावर एक वाजण्याची वेळ झाली; आतांच्या आतांच राजवड्यांत माझें काम आहे; करशील तर सांगतों.

तुळा०–मजकडून तयारी आहे, परंतु काम काय आहे हें मी समजलों नाहीं.

धन०–काम ह्मणून इतकेंच कीं, मला झोंप येत नव्हती, ह्मणून एक पुस्तक वाचीत बसलों होतों, त्यांत त्या लिहिणाराची शैली इतकी विलक्षण दिसून आली कीं, त्यामुळें माझ्या मनांत जे कल्पनेचे तरंग उत्पन्न झाले, ते एक तासावर वेळ झाला तरी कांहीं केल्यानें संपेनात. आणि त्याच घोटाळ्यांत पडून मजबरोबर प्रेमानें वागणाऱ्या राजकन्येचें स्मरण होऊन प्रेम रक्षणार्थ तिला दोन ओळी लिहिल्या आहेत. हें पहा पत्र (बंद केलेलें पत्र देतो.)

तुळा०–(पत्र घेऊन) शेटजी, आपल्या स्तुतीस जाग

नाहीं. काय करूं? मी जर आपल्या पदरीं नसतों, तर माझी स्थिति काय झाली असती? हा विचार मी ज्यावेळेस आपल्या मनांत करतों, त्यावेळेस मला माझा जन्म व्यर्थ वाटून मी स्तब्द बसतों. दुसरें काय करावें?

धन०–कां बरें?

तुळा०–शेटजीचा उपदेश व्यर्थ होत नाहीं म्हणून.

धन०–या तुझ्या बोलण्याचा अर्थ अद्यापि माझ्या लक्षांत कां येत नाहीं बरें?

तुळा०–ज्ञाते आहांत आपण. म्या शूद्रानें आपणास काय सांगावें?

धन०–अरे शूद्र झाला, अथवा महाशूद्र झाला, तरी प्रत्येकाचे विचार भिन्न असतात ना?

तुळाजी०–होय महाराज.

धन०–मग सांगण्यास भितोस कां?.

तुळा०–शेटजी, मी जात्या नीच; परंतु तुमच्या अनुसंगानें चार अक्षरें शिकलों. पण गरीबीमुळें विशेष अभ्यास करवत नाहीं. असो ! उपाय नाहीं.

धन०–तुळाजी, तुझी गरीबी मी जाणतों; म्हणून माझें जें कर्तव्य असेल तें मी कधींही सोडणार नाहीं इतकें तूं लक्षांत ठेव.

तुळा०–याविषयीं सेवकाची खात्रीच आहे!

धन०–तर मग,–

तुळा०–शेटजीनीं सेवकास जागेकरून चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्यानें हा गरीब थोर होईल असें जाणून जागें केलें नाहींना ?

धन०–अरे हा तुझा विचार अगदीं व्यर्थ आहे. कारण,

मध्यानरात्र होईपर्यंत जाग्रण झालें, आणि तुझी निद्रा भंग करणें मला बरें वाटलें नाहीं. शेवटीं तुला कामाकरितां जागें करणें भाग पडलें.

तुळा०—शेटजी, यजमानास जाग्रण आणि सेवकांस विश्रांति असावीना!

धन०—(हंसून) आतां पुरे कर. जा कसा (हातानें पाठ थोपटून) लौकर. इतकें काम कर म्हणजे झालें.

तुळा०—मजकडून मुळींच विलंब नाहीं. हा निघालों. (जाऊं लागतो व पुन्हा येऊन) शेटजी हें पत्र कोणांस देऊं?

धन०—तुळाजी, राजकन्येस पोहोंचेल असें कर. कारण कीं, तूं चोपदार आहेस.

तुळा०—मी कसा चोपदार? वडील चोपदार म्हणून त्याचा मुलगाही चोपदार असें नाहीं; आतां शेटजींचा चोपदार म्हटल्यास शोभलें असतें.

धन०—आतां ही गोष्ट राहूं दे,आणि काम लौकर कर जा.

तुळा०—हुकूम आहेना!

धन०—होय; पण हें दुसऱ्याच्या हातीं न जाण्याचा यत्न करणें तुझ्याकडे आहे.

तुळा०—शेटजींनी निष्काळजी असावें. त्या गोष्टीलाच जातों. (उभयतां जातात).

---

## प्रवेश ३ रा.

राजकन्या, (शारंगप्रभा) कपटी धनपाळ(सत्यसेन.)

स्थल अरण्य.

शारं०—(कांहीं कोस मजल झाल्यामुळें श्रम निवारणार्थ)— धनपाळा, माझें बाई अंग भारी दुखतें. अंमळ घोडा उभा कर. (तो घोडा उभा करून उभयतां उतरतात.)

शारं०–धनपाळा, आपण किती दूर आलों? (तो-कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून) बाई कांहीं विपरीत आहे! आतां काय करूं? माझी सर्वच निराशा झाली! (मनाशींच) देवा! तुझा असा मीं काय अपराध केला? असत्य बोललें, किंवा विश्वासघात केला म्हणून हे बाई माझ्या मनांत विचार येतात. (जवळ जाते व न्याहाळून पाहून.) अरे, तूं कोण आहेस? (तो तोंड फिरवितो) अरे भिऊं नको, कोणरे बाबा तूं? इतकेंच सांग.

क० ध० (सत्यसेन)–मी महान पराक्रमी, शूर दैदिप्यमान तेजःपुंज, जगांत श्रेष्ठ, असा सत्यसेन प्रधानपुत्र.

शारं०–(धैर्य धरून) नांवाप्रमाणें जात्याभिमान धरून खरें बोललास म्हणून ईश्वराचे तरी उपकार नकोका मानायाला?

क०धन०–शारंगप्रभे, ईश्वराचे उपकार खरेच. कारण कीं, दैवयोगानें तुझ्यासारखें रत्न मला मिळाल्यानें आकाशांत चंद्र रोहिणीचा जोडा जसा शोभतो, तसा तुझा माझा जोडा शोभणार आहे. कां खरें कीं नाहीं!

शारं०–सत्यसेना, रोहिणीचा जोडा शोभण्याला चंद्र अक्षयी असतां पंधरवड्यास क्षयी झाला; म्हणून तुला सांगतें कीं, स्त्रियांचा अभिलाश करून आपल्या आयुष्याचा क्षय कां करतोस! अरे, मी तुझी स्वामिणी म्हणून तुला बोध करतें कीं, हे सर्व अविचार सोडून मला माझ्या घरीं पोहोंचीव म्हणजे तुला बक्षीसही देईन; चल.

सत्य०–चल कोणीकडे? तुला घेऊन आलों ही नेण्याकरितां नाहीं; तर तुझ्या धनुष्याकृति भिंवया, मृगाप्रमाणें नेत्र, सरळ नासिक, व तुझ्या गालावरील गुलाब पुष्पाप्रमाणें

रंग पाहून अगदीं दंग झालों! आणि वक्षस्थळाच्या उंच प्रदेशावर चढाईकरून लढाई करण्याच्या इच्छेनें शरीरास कष्ट देऊन तुला स्पष्ट सांगतों कीं, तूं माझी मनकामना पूर्ण कर.

शारं०—अरे, सुजनाचें व्रतभंग करण्यास दंग झालास, पण मीही निक्षून सांगतें कीं, आयुष्य थोडें जाणून माया मोहांत न पडतां याच व्रतानें स्वर्ग सुख भोगीन. पण न होणारी गोष्ट कशी शेवटास जाईल, याचा तूंच विचार कर.

क० ध०—मी पूर्वीच विचार करून आलों. आतां तुला कांहीं विचार करणें असल्यास कर. (तिच्या संनिध जाऊन) चारुगात्रे, एकवार तूं आपल्या उभयहस्तांनीं आलिंगन देऊन हा (छातीस हात लावून) देह शांत कर. प्रियवल्लभे, कां बोलत नाहींस? (पुनः विचार करून) अरे मी चतुर ह्मणवितों आणि मला विस्मरण झालें? काय चमत्कार! मी धनी ह्मणून बसणें योग्य नाहीं. (उठून) कारण, आह्मां पुरुषांना घोड्यावरून नित्य फिरण्याची सवई; परंतु ही राजकन्या; हिला बहुत श्रम झालें असतील; तर हरयत्नांनीं हिला सुप्रसन्न केलें पाहिजे. (जवळ जाऊन) कां नाहींका बोलत? (ती दूर जाऊन उभी रहाते; हा हात जोडून) जर आपण बसाल, तर मी आपली पादसेवा करतों. आपण संतप्त होऊन शरीरास कष्ट देऊन गरीबावर इतका राग कां? तुमच्या पाया पडतों. परंतु एकवार या विराला पति ह्मणून पावन करा.

शारं०—तुला इतकाही विचार नाहीं, कीं जिचा तात पृथ्वीचा पति असून, ती तुझा अंगीकार करील तरी कशी? आणखी जनही कसे मान देतील? त्यांतून कितीही तूं यत्न केलास तरी तो व्यर्थ आहे, समजलास.

क० ध०—सुंदरी, तूं तर मलाच उपदेश करतीस. परंतु

प्रसंग कोणाशीं आहे ह्याचा विचार कर, तूं पोर आहेस.

शारं०–खरंच बाई. आईबाप, भाऊबंद यांना जरी मी पोर वाटतें, तरी मी अविचारी नाहीं. मला लिहितां वाचतां येतें.

क० ध०–शारंगप्रभे, तुला लिहितां वाचतां आलें ह्मणून तुला विचारी ह्मणतील असें समजूं नको. तूं अविचारी आणि ज्यारिणी आहेस. तुला शेवटचें सांगणें आहे कीं, तूं धनपाळाचा नाद सोडून मला वर; ह्मणजे आज तुझ्याकरितां आणिलेलें हें द्रव्य तुला देईन. (जवळ जातो, ती दूर दूर पळते) कां एकवार अधरामृत पान करूं दे.

शारं०–अरे मला द्रव्य नको, तुझ्याजवळ तें असल्यास त्याचा सत्कर्मी खर्च कर ह्मणजे लोक तरी तुझी कीर्ति गातील, उगाच अधरामृतपान करून अधोगतीस कां जातोस!

क० ध०–हे मृगाक्षी, 'द्रव्यानें सर्व वश होतात' या वाक्याप्रमाणें मजजवळ अपूर्व द्रव्य आहे, हत्यारें आहेत, आणि तुझ्यासारखी आतां स्त्री मिळाल्यावर जगांत मी धन्यच होईन!

शारं०–सत्यसेना, पतंग दिव्याच्या तेजाला लुब्ध होऊन त्याच्या अंगीं गुण जाणून त्यावर झेंप घालतो, पण शेवटीं सांगायाला जिवंत राहत नाहीं. तशी अघटीत इच्छा करून जीव देण्यास कां झटतोस?

क० ध०–(क्रोधानें) अग ये कारटे, मला ज्ञान नाहीं काय? तूं कालची पोरगी मला उपदेश करूं पाहात्येस? परंतु मी सर्वज्ञ असून महान पराक्रमी. माझें तेज पाहून सहस्रावधी राजपुत्र अधोवदन करितात, असें असतां तूं मला वश होत नाहींस?

शारं०–किती बाई तुला सांगावें.. अरे सत्यसेना, अशा अभद्र दुष्ट शब्दांनीं माझें अंतःकरण कां विदारतोस? ( सत्यसेन जवळ येतांच पडूं लागते व तो तिची वेणी धरून.)

क० ध०–( वेणीस धरून ) तुलाच विदारतों, मला वश होतेस कीं नाहीं?

शारं०–( खालीं मान करून ) नाहीं. ( खंजीर खुपसतो. ती निचेष्टित पडते )

क० ध०–( मनाशीं ) एक पिडा गेली."तुला नाहीं, मला नाहीं, घाल कुत्र्याला," अशी तर स्थिति झाली. आतां हें प्रेत येथें टाकून गेल्यास रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांनीं पाहिल्यास अथवा जातांना जर उजाडलें, तर आपणच अपराधी ठरूं; याला काय उपाय करावा? [ विचार करून कंबरेचा शेला सोडून ] ह्यांतच हिला बांधावी. [ बांधून ] आतां कोठें टाकावी? हां, ही जागा चांगली. [ काट्याच्या कुंपणांत ठेवून आजूबाजूंस काट्या लावून घोड्यावर स्वार होऊन निघून जातो. ]

---

## प्रवेश ४ था.

( राजपुत्राचा वाडा. )

**रासगुप्त, तुळाजी, रखमी कळवंतीण, सत्यसेन.**

तुळा०–अरे मघापासून येथें उभा आहें, कोणी येणारा दिसत नाहीं. शेटजीस निःसंशय कार्य करून येतों म्हणून पुरूषार्थ सांगून आलों खरा, पण आतां पुढें कार्यभाग होणें कठीणच दिसतो. काय करावें बरें? ( देवडीवर जातो ) अरे या देवडीवरही कोणी नाहीं. (विचार करून) आपणही येथेंच बसावें. (बसतो) पाहाटेस कोणीही भेटेल.(इतक्यांत रखमी

येते तीस पाहून) अरे ही कोण असावी बरें? हिचा झोंक तर वाड्याकडे दिसतो आहे. हिलाच विचारावें. (दटावून) कोण आहे? उभी रहा.

रख०—(भिऊन) कोणी नाहीं. (मनाशीं) आज बाई पुष्कळ दिवस झाले. रात्रीं अपरात्रीं पाहिजे त्या वेळेस येत्यें. पण मला कोणी विचारीत नाहीं; आणि आज हा देवडीवर कोण आहे? न जाणो सरकारास समजून त्यांनीं मला धरायला तर कोणी ठेवला नसेलना ?( भिऊन लौकर चालूं लागते ) कांहींका होईना ?

तुळा०—(तिला त्याहाहून जवळ जाऊन) कोण आहेस? इतक्या रात्रीं जात्येस कोठें ?

रख०—बाईसाहेबाकडे.

तुळा०—इतक्या रात्रीस कोठें गेली होतीस ?

रख०-मी घरून आल्यें.

तुळा०—तूं कोणाची नौकरी करितेस? खरें सांग ?

रख०—मी खोटं कशाला बाई सांगूं. राजकन्येचं दास्यत्व करित्यें.

तुळा०—तर तूं शारंगप्रभेची दासी आहेस !

रख०—होय.

तुळा०—बरें, जर तुला एखादें काम सांगितलें, तर करशील काय ?

रख०—काय बरं काम आहे?

तुळा०—तुझें नांव काय ?

रख०—रखमी.

तुळा०—रखमे, तुझ्या बाईसाहेबांस मला एक जिन्नस देणें आहे. ती कोणांस न समजतां देशील ?

रख०—मी बाईसाहेबांची दासी, मग त्यांना द्यायला मला काय झालें!

तुळा०—तर हें पत्र कोणांस न दाखवितां त्यांस दे समजलीस. (पत्र देतो.) (ती पत्र घेऊन जाऊं लागते.) आतां मी जाऊंना?

रख०—काळजी करूं नका, आपल्या सांगण्याप्रमाणें हें बाईसाहेबांस खचित देतें. (उभयतां जातात.)

—रासगुप्त०—(पलंगावर धुंद होऊन) केशरीपाक, गुलकंद, माजूम वगैरे रोज अम्मल करतों, परंतु निशा कांहीं येत नाहीं. काय करावें! भांग, चरस, चंडोल, हे नांवाचे कैफ. त्यांपासून मला तर मुळींच लेहेर नाहीं. डोळे रागावतात आणि प्रकाश पहात नाहींत. तोंडास कोरड पडते आणि वाटतें कीं, आमचे बाबा स्वर्गाहून माझ्या भेटीस आले आहेत, त्यांच्यासह स्वर्गी जावून सर्व पहावें. देव ह्मणजे काय आहेत! माझ्यासारख्यानी जर देव होण्याचा विचार केला तर सहज होईन. (आपणच हासतो) परवां नवऱ्यामुलासारखा तयार होऊन एक बैल व एक घोडा बरोबर घेऊन वाटेनें गेलों. त्यावेळेस यत्रिकरूसारखीं सर्व मुलें कुई करूं लागलीं. त्यावेळेस माझी छाती इतकी (हातानें दाखवितो) वर येऊन, मला असें वाटलें कीं, जगांत मनुष्यें आहेत, परंतु त्यांणीं आमच्या सारखी वागणूक ठेवल्यावांचून त्यांस कोणीही मनुष्यें अथवा जनावरें ह्मणणार नाहींत. आज माझी जी स्थिति आहे, ही कोणांस समजणार नाहीं. एक माझें, अव्वल देखणें माशुक, जिच्या करितां जन मजबरोबर बोलण्यासही इच्छीत नाहींत, पण मला तिचा नाद असल्यानें तिच्या पायां पडतों, नाक घांसतों, तरी ती मला चार-

त नाहीं आणि जोड्याजवळही उभे राहूं देत नाहीं. यामुळें लोकांत मला जो मांन मिळतो, त्या योगानें मला धन्यता वाटते. आतां मी राजा झालों. (उडूं लागतो, पुनः झोंक जातो) अरे असें काय होतें ? मीचना? होय, अरे पाणी-तूं आणी त नाहींस ? काय बेटा मूर्ख! असें जर होतें, तर आपण इतका कैफ कशाला करावा, सांगत होतों कीं, कैफ करायचा नाहीं.

रख०— (पलंगावर वरळत पडलेला पाहून) ह्या कैफातल्या गोष्टी; मला बाई वाटलं कीं, हे राजेश्री कोणाबरोबर बोलत असतील. पहावें, तर कोणीही नाहीं. काय बाई तऱ्हा! बिछान्याबरोबर सुद्धां बोलायचें. आतां तर शर्थ झाली. (जवळ जाऊन) कां जागे नाहीं का व्हायचं ?

रास०–हां–मी जागा असून तूं झोंप घेतेस !

रख०–कोणाला विचारतां? (कांहीं बोलत नाहीं असें पाहून) मी आहें ती. जरा डोळे उघडून पहा.

रास०–तूंच जर डोळे उघशील तर मला कळेल.

रख०–आपले डोळे उघडायाला दुसरा का मनुष्य लागतो !

रास०–आज माझ्या डोळ्यांस राग आल्यामुळें ते माझ्याशीं बोलत नाहींत.

रख०–खरं आहे, हे राजश्री तर कैफांत गुंग होऊन गेले आहेत; आतां यांच्याबरोबर बोलूं लागलें, तर काय उपयोग ? (त्यास सावध करते, तीस पहातोच.)

रास०–वाहावारे वा!–याचें नांव अक्कड–(उडून चालूं लागतो पण पुनःझोंक जातो) यंऊरे फक्कड! तुझा–झोंक नोक तर मला खुप निशा आणतो; या, बसा. (हात धरून बसवितो.)

रख०–ही बसल्यें, कां अद्यापि शुद्धीवर आलांत कीं नाहीं?

रास०–सुमारानें चालतों. तरी शुद्धीवर आहें.

रख०–मी काय बोलतें तें आपण एकतांना? (तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून उठवते) आज किंनाई आपल्याकडे येतांना काय झालें, सांगत्यें ऐका? (उठीवते.)

रास०–(पडल्या पडल्या) हो, हो, एकतों. पण. गडे, माझ्या आई तूं एखादी लावणी झण झणजे मला झोंप येईल.

रख०–(रागाऊन) झोंप येत असल्यास झोंप घ्या, मी जातें. (जाऊं लागतांच झोकांड्या खात खात जाऊन तिचा भरतो.)

रास०–चल, इकडे ये, अशी बैस. आतां मी गाऊं, कीं तूं गातेस?

रख०–आपलं गाणं होऊंद्या मग मी गाईन. (रासगुप्त गाऊं लागतो)

रासगुप्त– होरी.

(राग काफी–ताल दीपचंदी.)

शक्ति अतुल कैफाची ।। जी मैत्रिण मृत्यूची ।। ध्रृ० ।।
भांग अफिण ती चंडोल गांजा । दारू नानापरिची ।।
तन मन विषयीं गुंग कराया । मोहनास्त्रें हिं जीचीं ।। जी०।।
जिनें लोलुप केलीं सुमनें । शैवादिक शाक्तांचीं ।।
वर्णन तिचें करितां होई । गति कुंठित बुद्धिची ।। जी० ।।

भाणखी– ख्याल.

(राग बेहाग ताल त्रिवट.)

अससी प्रिय तूं मला । छकुडे ।। ध्रृ० ।।
बघतां तव मुख वाटे मनशीं । गुलाबचि फुलला ।। छकु० ।।
सौंदर्याची मोहक मूर्ति । रिझवी नयनांला ।। छकुडे० ।।
आंगकांतिनें लाजविसि तूं । चंपक सुमनाला ।। छकुडे० ।।

सुरत सुरंगीं निपुणची असती । किती वर्णूं तुजला ॥ छ०॥
बैसुनीं अंकीं प्रेमभरें तूं । आलिंगी तनुला ॥ छकुडे० ॥

रास०-आतां मी गवयांपेक्षां ही जास्त झालों. तर तूंहीं गा आतां

रखमी ना०- पद.

(राग पिलू-ताल धुमाळी.)

बहुमान्य अशा थोर कुळीं हो । जन्म असे आपुला ॥
परि त्या अभिमानाचा आपणा । विसरच कीं पडला ॥ ध्रु०॥
पौष्टिक सुरुचिर पदार्थ सेवनीं । विट कसा आला ॥
कैफाधिन होऊनी सदोदित । धुंदित कां पडला ॥
निंदितील जन देतिल दूषण । विचार स्वमनाला ॥
करुनी सोडा कैफ नाहीं तरी । मुकाल राज्याला ॥ बहु० ॥

(गाणें संपल्यावर) आज किनाई मी फार भ्यालें. मला वाटलें कीं सरकारांस गोष्ट समजून मला त्यानीं धरण्यास तो ठेवला असावा. पण जेव्हां मी सांगितलें कीं, राजकन्येची दासी, त्यावेळेस हिरजीच्या देवडीवरील मनुष्यांनीं मला आपल्या बहिणीला द्यायला एक कागद दिला. तो हा पाहीला का? हा द्याल ना तिला? (कागद देत्ये तो घेऊन.)

रास०-हो हो देईन. (ती जाऊं लागते) आतां कोठें चाललीस? (हात धरतो)

रख०-हें काय पण? मनुष्यें जागीं झालीं तर काय बरें ह्मणतील? हें कांहींच का समजत नाहीं? (हात सोडवून निघून जाते व सत्यसेन प्रवेश करतो व वाड्याच्या बाहेर आल्यामनातील विचार सत्यसेन बोलतो.)

सत्य०-काय करावें? जर माझ्या मित्र रासगुप्तास हें सांगावें, तर तो मजवर रागावेल. (मनाशींच) हा विचार व्यर्थ येतो. कारण, त्याची वागणूक मी चांगल्या रीतीनें जाणतों. त्याला जरी कांहीं सांगितलें, तरी तो ह्मणून मला असें

मुळींच विचारणार नाहीं कीं, तूं ही गोष्ट खरी अथवा खोटी सांगतोस; त्यांतून त्याला युक्ति प्रयुक्तिनें वश करून सांगितल्यास तो कोणासही सांगणार नाहीं. परंतु इतक्या पहाटेस त्याची माझी भेट कशी होईल? (विचार करून) पण बरें स्मरण झालें कीं, रासगुप्त आपल्या महालांत विषयसुख भोगीत रखमीसह बसला असेल. त्याला रात्रीं रखमी, व दिवसा कैफ यावांचून दुसरा उद्योग आहे कोठला? बरें महालांत रात्रीं बेरात्रीं पाहिजे त्यांनीं जावें. कोणास प्रतिबंदही नाहीं. मग उशीर कशाला; जावेंच, कांहीं होवो. (आड लागतो.)

सत्य०–(रासगुप्तास पलंगावर पडलेला पाहून) कां मित्रा, तूं तर सुखी आहेस आणि तुला झोंप नाहीं ही मोठीच आश्चर्याची गोष्ट आहे. अरे पिशाच्या सारखा रात्रंदिवस व्यसनांनीं डोळे लाल करून काय विचार करतोस?

रास०–(उठून) कां सत्यसेना, कालच्या बेताचें काय झालें?

सत्य०–काय झालें ह्मणून काय विचारतोस? सारी रात्र झोंप नाहीं, दाहा बारा कोस मज्जल झाल्यामुळें त्रासून गेलों.

रास०–सत्यसेना, तुला शारंगप्रभेनें त्रास दिला असेल नाहीं बरें?

सत्य०–आतां तिचें नांवही नको घेयाला.

रास०–कां बरें, तुमचें मन साधूंसारखें झालें.

सत्य०–मी तर बाबा, जगालाही त्रासलों. आतां नगरांत राहाणें नाहीं. नाहीं तर फट् ह्मणतां ब्रह्महत्या पाठीस लागायाची.

रास०–हें तूं काय बोलतोस?

सत्य०–मी ह्मणतों हें खोटें नाहीं.

रास०–अरे तूं माझा जीवलग दोस्त, आणि हें बोलणें तुला शोभतें काय?..

सत्य०– शोभो अथवा न शोभो, मला जर अभय देशील तर–

रास०–सत्यसेना, तुला अभय आहेच, तूं भितोस कां? मी राजा ह्मणून ?

सत्य०–रासगुप्ता, रात्रीची गोष्ट तुला समजली नाहीं. नाहीं तर तूंच मला कैद करून शिक्षा देण्यास कारण होतास ?

रास०–अरे जारे, तुला शिक्षा देणारा या जगांत आहे कोण ?

सत्य०–इतकें खचितना ?

रास०–दाहावेळ तुला सांगितलें, आणखी शंभरवेळां सांगूं.

रास०–मित्रा, काल दोनप्रहरीं पत्र देऊन तूं ऋणमुक्त तर झालास, तसाच मला दोषमुक्त होण्यास कारण हो.

रास०–तो कसा काय बरें ?

सत्य०–अरे रागाच्या आवेशांत मी अधर्म केला, तूं जर लक्षपूर्वक ऐकशील तर सांगतों.

रास०–मित्रा, जसा चार दिवसांचा उपवासी मनुष्य खाण्यासाठीं दाहापांच घरें हिंडून मनाला आनंद मानतों, तसा तुझा वृत्तांत ऐकण्यास मला अत्यानंद वाटतो; सांग पाहूं.

सत्य०–मित्रा, तूं माझा जीवलग मित्र, तुला सांगावें असें नाहीं. परंतु निरुपायामुळें सांगणें माझ्या दैवीं आलें. तें असें कीं, कालच्या पत्राप्रमाणें मोठ्या थाटानें केवळ रामाचें हें पागोटें पिछोडी आणि लांब आंगरखा घालून घोड्यावर स्वार होऊन या चौकांत आलो, नंतर संकेताप्र-

माणें खिडकीजवळ मोठ्या धिटाईनें जाऊन शारंगप्रभेस खूण केली आणि ती वाड्यांत आल्या. नंतर खुणेखुणेनें घोड्याजवळ आणून उभयतां एकाच घोड्यावर स्वार झालों व शहरांत न येण्याच्या विचारावरून जे साहीत्य तयार केलें, त्यासह पांच साहा कोस मज्जल केली, इतक्यांत शारंगप्रभेस उतरावेंसें वाटल्यावरून आह्मीं उभयतां खालीं उतरलों.

रास०–बरें मग.

सत्य०–मग ती धनपाळाच्या नांवानें मला विचारूं लागली; त्यावेळेस मजकडून तीस कांहींच उत्तर मिळालें नाहीं. अशासमयीं माझा चेहरा न्याहाळून ती ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागली; तेव्हां तिला पुष्कळ बोध केला, तरी ती ऐकेना, आणि उलट माझी निंदा करूं लागली; त्यामुळें माझ्या सर्वांगाची आग होऊन माझाच त्वेश मला न आवरतां त्या अबलेस.–

रास०–तर काय तूं त्या अबलेस घेऊन आलास? (उठून) कोठें आहे दाखीव पाहूं?

सत्य०–मित्रा, न दिसण्याच्या जागीं गेली, ती आतां तुला कोठून दिसणार?

रास०–अरे तूं स्वतः असतां ती पळाली तरी कशी!

सत्य०–रासगुप्ता, ती पळाली नाहीं, जग सोडून गेली.

रास०–ह्मणजे?

सत्य०–तिला मीं मारली. समजलास; हें पहा–(रक्त लागलेला खंजीर दाखवितो.)

रास०–(खंजीर हातांत घेऊन) ह्यानें तिला मारलीस. हें बरें चला; सुंठीवांचून खोकला गेला. तूं माझाच मित्र.

कालपासून लोकांनीं शूर ह्मणावें ह्मणून हिरजीचा खून केला आणि तिलांही सांगत होतों कीं, माझा स्नेही शूर, तर त्याचाही अनुभव तिला आला. ह्याला माझा काय उपाय? शाबास, शाबास; (पाठ थोपटतो) तूंही मोठाच शूरपणा केलास. या योगानें जगांत मी धन्य आहें!

सत्य०-मित्रा शाबासकी देतोस खरा. परंतु उदईक शारंगप्रभेची शोधाशोध होईल तेव्हां रे?

रास०-अरे आपणाला कोण विचारणार?

सत्य०-आणि जर कोणी शोधाला जाण्यास सांगितल्यास आपण काय सांगावें?

रास०-सांगूं कीं कोठें पळाली असेल, अथवा धनपाळानें नेली दुसरें काय?

सत्य०-खरेंच, ही युक्ति चांगली काढलीस. (आपल्या जवळील पत्र देतो) हें आपलें संभाळ.

रास०-राहूंदे तिथें. अरे पण माझ्या माशूकनें दिलेलें पत्र कोठें आहे! (इकडे तिकडे पाहून पत्र घेऊन सत्यसेनास देतो) हें पहा माझ्या डोळ्यास सर्दी झाल्यामुळें दिसेंनासें झालें. तूं तरी वाच ह्मणजे मला दिसेल.

सत्य०-(पत्र वाचतो) ॥ श्री ॥ मार्गशीर्षमास, कृष्णपक्ष, तिथी ९ मी, भौमवारे, (रासगुप्तास) मित्रा, नीट लक्ष देऊन ऐक-सकळगुणगंभीर आर्यकुलाभिमानी, स्वसौंदर्याजिंक्य सत्यव्रतभूषित स्त्रीधर्मपालक अखंड वज्रचुडेमंडीत, राज तनये बंधुवर्गांत प्रेम धरून पितराज्ञेनें भद्रावतीस जाणें आहें, इतःपर वचनास बाध न येऊं देणें हें ज्ञाते जनाचें काम आहे. असें स्मरण झाल्यामुळें दर्शनलाभाची इच्छा व्यर्थ. कारण, सूर्योदयीं नगराबाहेर जाणें आहे. पत्रविस्ता-

रास्तव पुरे करितों. गरीबावर प्रेम ठेवावें.

धनपाळ हिंमतराम,

कां ऐकलें ना ?

रास०-हो मग, मला यांत कांहीं समजलें नाहीं.

सत्य०-मित्रा, अरे हें त्या सावकाराच्या पोरानें तुझ्या बहिणीस लिहिलें आहे; यांत भद्रावतीस वडिलाच्या हुकमानें उद्यां प्रातःकाळीं शहर सोडून जाणार, तर प्रेमांत अंतर पडूं नये वगैरे चांगला मजकूर पुराव्यास आहे. जर तूं माझ्या मताप्रमाणें वागशील, तर धनपाळाचाही सूड घेऊं.

रास०-तो कशा रीतीनें सांग पाहूं ?

सत्य०-रासगुप्ता, उद्यां शोधाशोध होऊं लागली ह्मणजे तिच्या निजण्याच्या जागीं जाऊन हें धनपाळाचें पत्र मिळालें असें सर्वांस सांगून दरबारांत वर्दी दिल्यानें तुला लोक मान देतील आणि नंतर धनपाळास धरून त्या जवळ खंजीर सांपडला असें सांग कीं तो मेलाच.

रास०-बरें आहे. (उठून जाऊं लागतो).

सत्य०-अरे कोठें जातोस ?

रास०-आतांच मी माडीवर जाऊन सर्वांस सांगतों.

सत्य०-(त्याचा हात धरून) छी छी; ह्या वेळेस नको.

रास०-तर केव्हां ?

सत्य०-सकाळीं शोधाशोध करूं लागले ह्मणजे मग आपण वर जावें समजलांत. आतां मी जातों. उशीर बराच झाला. येतों बरें. सांभाळ. जातों मी. (निघून जातो).

---

## अंक ४ था.

### प्रवेश १ ला.

(अरण्य.)

मन्या, सुभान्या, सदवा, ग्यानवा, सटवा–रामोशी राजकन्या शारंगप्रभा.

मन्या–कायर बिव्यानों, आपुनतर परवर घेऊन शेनी आलो तवापास्न माझ्या जिवात सुख नाई पगा.

सुभा०–व्हो बिव्या, दिसाया लई धष्टा दिसतोया, आनिक सुख नाहीं लगतोय.

सदवा०–अवराव, त्येची खुस्तीची कमी न्हायी, परवां मन्या भाऊची आनिक सटवाची जवकां जोड सुटली तव त्येनी हं हं लगतांच खाला राव.

ग्यान०–अर रामोशीच बच्चेतुमी, आनिक तुमीबी बाताच शोंकता; कोतवाल चावडीवर खबर देऊनशीनी आपआपलेजागीं सुखामंदी जांव त्ये काईबी न्हाई, आनिक वटा वटा वटा बोलत्यात.

सटवा०–कायर बिव्या, बर्मग्यानी, ह्यास्नी परमेसरानें गिन्यान धिलय आनिक आमास्नी कशापाई येणार?

मन्या०–एकापक्षी योक गिन्यानी. ह्यो संमदा परसंग तुमापाई आला. ह्यो सुभान्या, गेनबा, सदबा, हेनी मास्नी भर देऊनशेनी खुस्ती कराया लावाल, आनिक आपून संमद निसाटले.

सुभा०–आनराव, आमी बी मोप तुमा पाई त्येसी खुस्ति केली; पर बिव्यान आमाल्नी जेरीस आनूनशेनी गमजा करतोया पगा.

सद०–पगा पगा काय झगतोया लेका, (कावरां बावरं होऊन) आनिक इय कोन कनतोया.?

ग्यानं०– अर कोनी का असना, आपुन कशा पाई, पगाव?

सद०–( दुरून शेल्याचा पदर पाहून ) पगा तर खर, (हातानें दाखवितो ) स्ये त् त् झकाकतय स्ये काय र हाई!

मन्या०– ( न्याहाळून ) अर खरर खर! आज इसर जनु झाला परसंन! चलाकीहो मर्दानो अन पगता काय?

सुभान्य–आपुन इकत इसम असूनशेनी भ्याड्यावानी भिता काय राव.

सद०–अवराव तुमास्नी काईबी वाटत न्हाई. पर कुनी मनुकक्ष हाये का भुत हाये?

ग्यान०–अर ल्योका चल, बायकोवानी भितोस काय? आपुन जाऊन पगू. (जाऊं लागतो.)

सदबा–चला मर्दाहो दिवसवर निगाया झाला, आनिक भुतबीत कुनीकुंड येत!

मन्या०–( कान देऊन ) इकस्या मंदीच कोन तरी कनतोया, आपुन मागमूस लाऊनशेनी चावडीवर जाऊं किर.

सदबा०–"देव देतोया, अन करम नेतोया," तस राव काय करता. ( हातानें दाखऊन ) ती गठडी पगुनशेनी जाऊं कीं मर्दाहो.

सर्व–चला किर इचे बहीन ( गठडींत कोणीं कण्हें आहेसें पाहून चरकतात. )

ग्यान०–(भिडाईनें) अर अस चपापतार काय बिच्याहो? रामोशाच बच्चे तुमी आनिक अस का करता? (काठीनें शेल्या-

चा पदर बाजूस करतो आणि अलंकारानीं युक्त हस्त पाहून) अर मनुकक्ष, रे ते मनुकक्ष.

सटवा०–(अलंकार पाहून आश्चर्यानें तोंडास हात देऊन) अबबब! अग बया बया हेर काय?

मन्या–अर काय म्हनुनशन काय इचारतोस ल्योका. संमद जमुनेशिना हीस भाहीर घ्या, म्हजी झाल. (सर्व लागून गठडी उचलू लागतात.)

शारंग०–(गठडींतून मोठ्या काकुळतवाणी) बाबानों, हळू हळू उचला. माझें आंग कणत आहे! (ते आजूबाजूच्या काटक्या तोडून.)

सुभा०–भेऊ नकोस बये, अर ये, त्ये बाजूसनी हळू हळू निसाट ल्योका भाइर. (सर्व मिळून कुंपणाच्या बाहेर आणतात.)

शारं०–(कण्हत) बाबानों मला तुम्हीं जीवदान देत आहांत (वस्ती व रक्तानें भरलेला साडीचा भाग हातानें पाहून) अग आई! आईग! ही मेल्यानं कंबर कांपली! आतां मी कसची वाचतें! गेल्या जन्मी कोणाचा घातपात केला म्हणून मला जगांतून लवकर नेतोस! त्याचं मला दुःख नाहीं. पण लहानपणापासून माझें सर्व आयुष्य सुखांत घालिवलं, आणि आज माझ्या जीवाचे अशा हाल अपेष्टा होऊन चाकर, दास, दासी यांस सोडून मेल्या घातक्यानें काव्याच्या कुपणांत टाकली, तरी मजगरीबाची देवा तुला दया आली नाहींना? मी जन्मून आणि न जन्मून सारखीच. माझ्या हातून परोपकार अथवा परमार्थ कांहींच झाला नाहीं. आईबापांस सोडून आलें, किंवा अनाचार केला. अथवा एखादं व्रत मोडलें केलें तरी काय कीं, तूं मजवर रुष्ट होऊन मला दुःखी करून माझा अंत करतोस? देवा, तूं सर्वांचा त्राता असून

तुझ्यानं माझं रक्षण झालं नाहीं ना?. आतां मी करूं तरी काय? मेल्यानं नांवसारखं वायांविचं टाकून आईबापांस दोषी केलं, त्यापेक्षां जन्मलाच नसता, अथवा लहानपणींच मेला असता, तर मजवर ही वेळ कां आली असती? आतां मी काय करूं?

**मन्या०**—(तिचा शेला सोडून तिला मोकळी करतो व रक्त पाहून) अररर! अंगी जखम!! ही पगा. बया तूं रडूं नग (दोघे लागून हळूच तिला बसवितात.)

**शारंग०**—बाबानों मी तुमची धर्मकन्या, तुमच्या पाया पडून सांगतें कीं, मी तुमच्या उपकाराची उतराई होणार नाहीं. दोन तीन घटका या कुपणांत पडलें होतें, पण आंग हालवितां येईना, तुमचे शब्द ऐकून कोणी मनुष्यें काढतील असें वाटून कण्हूं लागलें (रडते) देवा! आतां मी कुठें जाऊं! माझ्यानं चालवत नाहीं! माझी अवस्था काय होणार! (सर्व निमूटपणें ऐकतात व निराश्रितपणें ती रडूं लागते. सटवाजी आंगास टोंचलेले कांटें काढतो.)

**मन्या०**—बया, तू हित कशापाई आलीस.

**शारं०**—बाबानों दैव माझं ह्मणून इथे आलें आणि हें दुःख भोगणं भाग पडलं. त्याला कोणाचा काय उपाय?

**सटवा०**—तू कोन हाईस अन कुनीकड रहातेस?

**शारं०**—मी निराश्रित आहें आणि फार दुरून आलें आहें. माझं घरदार कोठें आहे तें मला ठाऊक नाहीं. मी तुमच्या पाया पडतें, हात जोडतें, पण मला तुम्हीं बरी होईपर्यंत संभाळा. बरी झाल्यावर तुमच्यासह घरीं जाऊन तुमच्या उपकारांतून सुटण्यास तुह्मांला माझ्या दागीन्यांतून कांहीं देईन; पण आतां मला थंडी सहन होत नाहीं. काय करूं?

सटवा०-बया तु भीतीस कशापाई. (जखम पाहून) लैई चांगलं झाल बगा! जखम तर लैइ मोठी हाये; पन मास चिकटलैस वाटतया. ह्यो घाय तर भरला पन जखम बरी होयास योक झाडाचा पान हाई त्यासीं तवांच बर व्हईल (शारंगप्रभेस) बया, तूं बैस हित. मी ह्योच पान घेऊन शेनी येतोय. (निघून जातो.)

शारं०-बर बाबा, तुला तरी माझी दया आली. ईश्वर तुझे कल्याण करो.

मन्या०-बया रडती कशा पाई? ह्यो परानी (छातीस हात लावून) तुझ काईबी कमी करनार नाई. मी झालोया म्हातारा. माखी न्हाई मुलबाळ. तू मजसंग चल अजी लेक म्हनुन जो जाडा भरडा भाकरीचा तुकडा गवसल तो खाऊनशेनी रा. (अवरू जाऊन) येतीस बया!

शारं०-बाबानों ज्या ठिकाणीं न्याल, तिथे मी येतें. पण माझ्यानं चालवत नाहीं. थंडीनं माझे आंग आखडून वळ येतात. आई, मी काय करूं? (रडूं लागती (इतक्यांत सटवाजी एका झाडाची पोन चार पानें घेऊन येतो.)

सटवा०-(पानें बांधून) बया उगी रहा, ही दवा तवांच बर करील.

सुभा०-ये मन्याबा, हीस काइबी युगत करूनशेनी घरी घेऊन चला अजी जरा सुख व्हाइल.

सटवा०-कायर बिन्धा सुभान्या, बिचार न्हाई, कायबी न्हाई, आनिक चालल्ले बिटे घरी न्हायला? (अलंकार पाहून) डोळ कस झकझक लागत्याती कराया.

मन्या०-आपुन रामोशी बच्च. आपनाम्बी कशापाई व्हाव. ह्या परनची आण घेउनशेनी सांगतो, हीं बया माझी

ल्योक; मी पाठी बांधून घरी नेतोय्‌. ('शारंगप्रवेश) कां बये घरी चलती का ?

**शारंग०**–(मनाशींच) देवाधिदेवा, शिकलेल्या मनुष्यानी माझी स्थिति काय केली आणि हे बाई रामोशी यांची अक्षराची जन्मांत दिखिल ओळख नाहीं; अशा मनुष्यांपासून मला कांहीं अपाय होईल असं वाटतं नाहीं, पुढें काय होईल ते होवो. (उघड) होय येतें पण मला संभाळून न्या बरँ.

**मन्या०**–बया बैस या झेल्यांत (झेला पसरतो) अजी बांधून घेतो. (तिला पाठीस बांधून सर्व निघून जातात.)

---

## प्रवेश २रा.

### (राजवाडा.)

**कांतीवर्म**–(आर्य महीचा पालन कर्ता,) सुशर्मा (प्रधान) भागुसिंग (सेनापती) श्रीनिवास राव (न्यायाधिश) रासगुप्त०–(राज पुत्र) विठूजी (चोपदार) (खिन्न झालेला राजा कपाळास हात लाऊन बसला असता प्रधान येतो)

**सुशर्मा०**–महाराजांचा जयजयकार असो. आश्रितांस अघटीत गोष्ट समजल्यामूळें विस्मय होऊन तिच्या परिहारार्थ आपल्या आज्ञेची वाट न पहातां योजना केली ह्मणून दास क्षमा मागतो आहे.

**रा. कांति०**–(दुःखानें) दास, आज मजवर पर्वत पडला; परंतु प्राण गेला नाहीं. जगांतून नांव लौकिक, नाहींसा झाला. मुखाला कलंक लागला. तनुवृद्ध झाली. अशा प्रसंगीं प्राण त्यागावांचून अन्य प्रायःश्चित नाहीं.

**सुश०**–महाराजांनीं सेवकाच्या बोलण्याकडे लक्ष दिल्यास एक विनंती करीत आहें.

कांति०–मंत्री, मी फार त्रासलों. मला कांहीं सुचत नाहीं. बोला काय बोलतां तें?

सुश०–महाराज, आपण सत्ताधिश आहांत, जनापवादास भिऊन दुःखातीशयानें धैर्य हत न होतां, योग्य चौकशी करणें सोडून दासाचे सूचनेंकडे दुर्लक्ष करूं नये. त्यांतून दोनघटका दिवस वर आला होता, अशा वेळेस वाड्यांतुन खबर लागतांच चोहों दिशेस सेवकजन शोधास गेले आहेत. रात्रींतून दाहा अथवा पंधरा कोश मजल करील. यापेक्षां जास्त मुळींच होणार नाहीं, आतां सेवकाचे परिश्रम फलद्रूप होऊन महाराजांचें दुःख विर्सजन होवो; हीच दासाची ईश्वराजवळ विनंती आहे. (सेनापती राजाचें व प्रधानाचें श्यम चित्त पाहून.)

भानु०–(लवून तीन वेळ मुजरे करून) अन्नदाते, सेवकास दुःखकारक वर्तमान सांगण्याचा ईश्वरानें प्रसंग आणला आहे. आज दाहा पांच गुप्त शोध काढणाऱ्या सैन्याच्या तुकड्या चोंहोबाजूंस शोधास गेल्या आहेत. त्यांपैकीं हिरजीच्या देवडीवर एक शेला, एक पागोटें सापडलीं आहेत. असें सांगून त्यानें हिरजीचाहि शोध केला, तर तोही नाहीं. त्यावरून हिरजी बाईसाहेबाबरोबर आहे हें खचित सिद्ध होतें, आणि त्या बुरजाच्याच वाटेनें शाळेंत जाण्याच्या रस्त्यांनें निघून गेल्या असाव्या. कारण, बाकींच्या पहाऱ्यावर चौकशी करून आलों. आतां सेवकास काय आज्ञा होत आहे? (रासगुप्त येतो.)

रास०–(नियमाप्रमाणें मुजरे करून) काका साहेब, मी निजून उठलों, त्यावेळेस मला कोणीसा असें बोलला कीं, तुमच्या शारंगप्रभेस ह्मणजे माझ्या ताईला कोणी रात्रीं

पळवून नेलें. त्यावेळेस मी थोडासा झोपेंत थोडा जागा होतो. परंतु हलीं माझी प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें मला उठवेना ? तोंडचें पाणीं पळतें, आणि घशास कोरड पडती. तेथें माझा काय उपाय ? सकाळीं थोडें जिवाला सुख झालें, आणि ताईच्या मेदीरांत जाऊं लागलों; तेव्हां एकानें सांगितलें कीं, ती खरोखरीच गेली; त्यावेळेस मला तें स्वप्न वाटलें आणि वर जाऊन तिच्या खोलींत तपास केला; पण कांहीं मिळालें नाहीं. बिछान्याखालीं एक चिटोरें पाहिलें, तसाच मोठ्या पराक्रमानें बिछाना उचलून तें चिटोरें पाहूं लागलों, तर त्यांत सावकाराचा पोर धनपाळ-?

मुश०-बरें महाराज, पण तें चिटोरें आहे कोणीकडे?

रास०-थोडा दम धरा तर खरे; (राजास) काकासाहेब, तो धनपाळ, हिंमतराम सावकार आपल्या राज्यांतला, तुह्मी त्याची विद्वत्तेकरितां थोरवि गात होतां, तेव्हांच मी सांगणार होतों कीं, ही त्याची सही, पण मला त्या वेळीं विचारतो कोण ? आम्हीं मूर्ख, आह्मांस नीचांची संगत लागली, बदफैली निघालों; ह्याला शिक्षा करून विद्येंत तयार करा, तर आतां तुह्मींच प्रधानजी सांगा, कीं मी विद्वान् कीं तो विद्वान् ?

कांति०-तूं तर महा विद्वान्, तुझ्या बोलण्यावरूनच परीक्षा ही.

राग०-(गर्व चढून मंदिलांतील पत्र काढून पुढें टाकतो) हें पहा, आतां परीक्षा उतरली किंवा नाहीं?

राजाकांती०-(त्रासानें) मंत्री पहा तें पत्र. (प्रधान पत्र वाचून स्तब्ध उभा रहातो) आपण स्तब्ध कां ?

श्रीनिवास०—( श्रीनिवासराव नमस्कार करून ) आज कांहीं गुप्त विचाराची योजना आहे वाटतें !

सुश०—( पत्र पुढें करून ) आपण न्यायमूर्ति आहांत.

( पत्र देतो. )

श्रीनिवास०—( पत्र वाचून ) पत्रांतील आशय गमतीचा आहे, कर्त्याचें नांव ही सही प्रसिद्ध करतेंच. त्यावरून साक्ष मूळीच नको असें वाटतें; या उपर प्रजा पालाकांची मर्जी.

सुश०— ( राजास ) अपराध्यास न्यायासना समोर हजर करण्यास आज्ञा असावी.

रास०—( प्रधानास ) आपण जाणार आणि आह्मीं हातांत कंकणें भरलीं आहेत कीं काय? आह्मांला काका साहेबांची आज्ञा मान्य करणें ह्मणून इकडे आलों; नाहीं तर तुह्मीच त्याला सोडला असता. आतां नाहीं ना सोडणार त्याला !

रा० कांति०—काय बेटा शुद्ध पशूच आहे. तूं काय बोलतोस आणि काय करतोस याचा तुला कांहींच विचार नाहीं. तुला पाठवून काय उपयोग?

रास०—उपयोग नाहीं कसा? मला मनुष्यें द्या ह्मणजे हें हें ह्मणतां मी त्याला धरून आणीन समजलांत.

रा० कांति०—कोण आहेरे बाहेर?

विठूजी०—जी. ( प्रवेश करतांच ) सकलगुण कलाप्रविण आर्यभूषण श्रीमंडित महाराज कांतिवर्म राजपालकाचा जयजयकार असो. ( एका हातांत सोन्याची काठी व एका हातांनीं मुजरा करून ) महाराजांची काय आज्ञा होत आहे ?

कांति० रा०—विठूजी, बाहेरच्या बाजूस कोणी दोन

चार पाहारेकऱ्यांस ( रासगुप्तास दाखवितो ), याच्या बरोबर जा. आणि हिंमतराम सावकाराच्या मुलास एकदंम कैद करून घे. ऊन या. ( शिहूजी आज्ञेप्रमाणें जातो व रासगुप्तास ) कां? उठा आतां उशीर कां?

रास०–काकासाहेब हा निघालोंच ( निघून जातो.)

---

## प्रवेश ३ रा.

( नगराबाहेरील रस्ता.)

धनपाल–सावकारपुत्र.
रामचंद्रपंत-भद्रावतीहून आलेला कारकून.
तुळाजी–सावकारपुत्राचा गडी
संतुजी–गाडीवाला.
रासगुप्त– [ राजघरण्यांतील मुलगा.]
राम्या. } येसु. } शिपाई.
धोंडी. }

धन०– ( मार्गांत शेतकरी लोकांस पाहून गडीत ) रामचंद्रपंत, आतां दहा घटका दिवस आला. मला वाटतें कीं, आपण सूर्योदयापासून पांच तासांत सुमारें सात कोस दूर आलों; परंतु ( शेतकऱ्यांस दाखऊन ) अशा लोकांस ते वैदिक नियमाप्रमाणें काबाड कष्ट करीत असतांहीं अन्न वेळच्या वेळेस मिळत नाहीं, त्यामुळें त्यांच्या शरीराचें रक्षण न होतां रक्त जळतें आणि कृश होतात, व आपल्यासारखे स्वच्छ व सुशोभित न दिसतां किती ओंगळ दिसतात! सूर्याच्या तापानें भिन्न वर्ण झाले तथापि त्यांचा खेद न मानितां सहनशीलता अनुभवीत आहेत. आतां त्यांस राहाण्यास जागा, गुरेंढोरें जरी आहेत तरी त्यांवर अवलंबून न रहातां स्वतः पशुपक्षांही ते विशेष श्रम करि-

.तात. अशा कष्टावर व्यवसाय करणारे इतर राजापासून रंकापर्यंत त्यांच्या कष्टांविषयीं मुळींच शोध करीत नाहींत. हे नांवांचे बेरोजगारी शेतकरी झाले आहेत. त्यांनीं आपल्या मोठ्या कष्टानें मिळविलेल्या द्रव्यानें कुटुंबाचें तारुण्य दशेंत पालन होणें अशक्य मग वृद्धावस्थेंत हातपाय थकल्यास जमीन दुसऱ्यांस देऊन सारापट्टी भरून उरल्यास, जो तळें राखील तो पाणी चाखिल्यावांचून राहाणार आहे? अशा रीतीनें सावकाराच्या घरांत चक्रव्याढ व्याजानें एक दोन वर्षांत मुद्दलांत कांहीं मिळून मुद्दल अजबात सुटतें आणि व्याजांत जमिनीचा ताबा स्वाधिन होतो. परंतु विद्यावृद्धिविषयीं विचार कोणीच करीत नाहींत. या लोकांस विद्या शिकविल्यानें हे उत्पन्नाच्याच मानानें खर्च करून आपल्या निराश्रित कुटुंबांस अन्नाचा सुकाळ करतील. अशानें प्रजेची वढती होऊन व्यापारास उत्तेजन येईल आणि प्राणीमात्रांस आनंद वाटून राज्यकर्त्याविषयीं पूज्य बुद्धि उत्पन्न होऊन ते ईश्वराजवळ अभिष्ट चिंतन करतील. कां तुह्मांला माझे विचार कसे काय वाटतात?

राम०–शेटजीचे विचार मोठे गूढ खरे! पण आपल्या मताप्रमाणें वागतो कोण?

धन०–न वागलें तरी कांहीं चिंता नाहीं; परंतु जितकीं मनुष्यें आहेत त्यांचें एक मतें एक विचारें जर वर्तन झालें तर खचित शेतकऱ्यांचा ऊर्जित काळ होऊन, आर्यमही सुवर्ण कांतीची होईल, आणि शेतकरी देवासारखे तेजःपुंज होतील, परंतु तें होण्यास विद्येवांचून अन्य साधन मला दिसत नाहीं.

रामचंद्र०-शेटजीचें, विद्येवांचून इतर व्यवहारीक गोष्टींकडे लक्ष अम्मळ कमी असतें असें वाटतें.

धन०-(हांसून) पंत आपण वडील आहां, राग मानूं नका बरें? व्यवहारांत जास्त अथवा कमी, नफा अथवा तोटा, हित अथवा अनहीत, नीच अथवा श्रेष्ट, मान अथवा अपमान ह्या सर्व शब्दांचा एकमेकांशीं निकट संबंध आहे किंवा नाहीं हें पहावयास जसें मनुष्यांस आपलें स्वरूप आरशांत दिसतें तसेंच पूर्वी सांगितलेल्या शब्दांचें पूर्ण स्वरूप पहाण्यास विद्येवांचून दुसरा आरसा नाहीं, ह्मणून जगांत उत्तम वस्त्रें व अलंकार घालून लोकांत सौंदर्याची अथवा श्रीमंतीची प्रतिष्ठा भोगणें त्यापेक्षां अनेक विद्याधनांनें श्रीमंत झालेल्या लोकांनीं आरशांत विद्वत्तेचा पोशाख, श्रीमंत रीतीनें पाहील्यास त्याला आपलें स्वरूप तुच्छ वाटून पूर्व कर्वीस श्रीमंत आणि ज्ञाते ह्मणणें भाग पडतें. कारण, अविचाऱ्यांस विचार कोठून? आणि विद्वानांस अविचारी कोण ह्मणेल? याकरितां विद्याधनानें त्यांस श्रीमंती देणें हें राज्यकर्त्यांकडे आहे.

राम०-शेटजींच्या बोलण्यास आड येतों ह्मणून क्षमा मागतों.

धन०-क्षमेचें कारण काय? तुह्मास जें विचारणें आहे त्याविषयीं जी मला अल्प माहिती असेल ती मी स्वसंतोषानें सांगेन.

राम०-शेटजी, तर राज्यकर्त्यांनीं शाळा स्थापून शिक्षण दिल्यानें हे लोक श्रीमंत होतील. काय?

धन०-रामचंद्रपंत, शाळा स्थापून त्यांस योग्य शिक्षण मिळाल्यास श्रीमंत होतील यांत नवल नाहीं; परंतु आतां

जे दरिद्री होऊन गेले आहेत त्यांस स्थितिवर आणण्यास प्रथमतः जमिनीचा जब्बर सारा कमी करून अन्यदेशीय माल आपल्या देशांत. उत्पन्न करण्याकरितां ज्या अफाट पडलेल्या जमिनी आहेत, त्या प्रजेस उत्तेजनार्थ दिल्यानें देश सुपीक होऊन राज्य भरभराटीस येईल आणि परदेशीय राजे मनांत दंग होऊन—अन्य देशीय प्रजा वसाहतीच्या मिषानें आल्यास त्यांनीं आपलें आयुष्य कितीही खर्च केलें तरी प्रवेश न होतां राजा आणि प्रजा या उभयतांचे ऐक्यतेविषयीं मर्मज्ञ जे असतील ते आश्चर्य करतील ह्मणून अज्ञानांस विद्या शिकविण्यास उत्तेजन देऊन त्यांस ज्ञान संपादनार्थ पुस्तकें, इतिहास, वगैरे ग्रंथावलोकनानें स्वकर्मीस ह्मणजे नोकरी, व्यापार, वगैरे व्यवहारनिमित्य जितके ह्मणून मनुष्यमात्रास व्याप आहेत, त्यांत तो दुःख न मानितां, विद्येच्या जोरानें प्रखर सूर्यासारखा तेजःपुंज दिसेल; आणि आत्महितार्थ यथामती विद्याधन खर्च केल्यास राजापासून रंकापर्यंत कमिजास्तपणा न राहतां, अत्यंत प्रेम वाढेल, (इतक्यांत साहा सात घोडेस्वार अति वेगानें येताहेतसें पाहून) अरे गाडी बाजूस घे (तो बाजूनें चालवित असतां).

रास०—अरे गाडी धांववूं नकोस उभी कर (इतक्यांत गाडीच्या चोहीं बाजूस स्वार उभे राहतात).

संतुष्टी०—(नम्रतेनें) उभिच आहे महाराज. (गाडी उभी करतो).

रास०—गाडींत कोण आहे रे?

धन०—(गाडींतून) कां रासगुप्त माहराज? काय आज्ञा होत आहे?

रास०-अरे, धनपाळा, मी राजपुत्र, व तूं यःकश्चित सावकाराचा पोर आणि तूं माझी अमर्यादा करतोस? ऊठ, ऊठतोस कीं नाहीं?

धन०-कां, मी कांहीं अपराध केला आहे कीं काय?

रास०-अपराध केला काय म्हणून मला विचारतोस! उतर खालीं मग सांगतों.

धन०-(शिपाई वगैरे पाहून खिन्न होऊन गाडींतून उतरतो.) काय आज्ञा आहे महाराज.

रास०-तूं खरें बोल शारंगप्रभा कोठें आहे ती?

धन०-वाहवा महाराज, कांहीं तरी विपरीत विचारावें दुसरें काय?

रास०-दुसरें काय? हें तिसरेंच दाखवितों धीर धर (शिपायांकडे पाहून) पहातां काय, बांधा याला आणि घाला हातांत बिडी!

धन०-रासगुप्ता, हें काय अघटीत बोलतोस.

रास०-(शिपायांस) वाट कोणाची पहातां? घाला बिडी, आज तुमच्या धाकट्या राजाचा जयजयकार झाला. (आपलीच पाठ आपल्याच हातांनीं थोपटतो) शाबास! शाबास! शाबास! (शिपायांस) अरे गाडींत शारंगप्रभेशिवाय दुसऱ्या मानुक स्त्रिया किती आहेत पहा?

येसु०-(गाडींत पाहून) दोघेजण आहेत महाराज.

रास०-दोघीही देखण्या आहेत काय?

राम्या०-बायका नाहींत पुरुष आहेत महाराज.

रास०-त्यांचा मला चेहरा पाहूंद्या, उतरवा त्यांस, खालीं.

येसू०-अरे बाबानों खालीं उतरा (निमूटपणें खालीं उतरतात.)

रास०–ह्या दोघांसही बिडी घाला.

येसू०–सरकारं दुसऱ्या बिड्या नाहींत.

रास०–दुसऱ्या बिड्यां नाहींत तर हीं (हातचीं कडीं काढून) सोन्याचीं कडीं घालून दंडास शेल्यांनीं बांधा ह्मणजे पक्के कैदी दिसतील.

राम्या०–महाराज, सोन्याचीं कडीं कशाला पाहिजेत? शेल्यांनींच बांधतों ह्मणजे झालें.

रास०–(रागानें) तूं कोण, राजा आहेस? मी सांगेन तसें कर.

राम्या०–बरें आहे महाराज, (दोघांच्या हातांत एक एक सोन्याचें कडें घालून उभा रहातो.)

रास०–अरे अजून हे मोकळेच दिसतात!

येसू०–महाराजांस पूर्वींच सांगितलें कीं, यांनां शेल्यानें बांधले पाहिजेत.

रास०–बरें तर यानां शेल्यांनींच बांधा, (आपला शेला बांधण्यास देतो तो घेऊन शिपाई त्यांस बांधतात)

राम्या०–सरकारच्या आज्ञेप्रमाणें दोन कैदी केले परंतु तिसऱ्यास बेडी घालण्याची जरूर नाहीं. कारण, तो आपल्या संगतीं येण्यास तयार आहे.

रास०–कोण धनपाळ.

राम्या०–होय महाराज.

रास०–अरे, त्यानें मला शाळेंत फार त्रास दिला होता ह्मणून त्याला क्षमा होणें नाहीं. त्याच्या हातांत ती लोखंडी बिडी घालून घेऊन चला.

राम्या०–ठीक आहे (धनपाळाच्या हातांत बिडी घालून बंदीवान करतात.)

येसू०–महाराज आतां काय हुकूम होत आहे?

रास०–(घोड्यावरून उतरून) थांबा; मी यांच्या गाडीची झडती घेतों (गाडींत बसून थोड्याच वेळानें बाहेर येऊन त्याना सह खंजिर दाखवितो) हें रे काय? हा खंजिर तुझ्या गाडींत कोठून आला?

धन०–(धीरतेनें) महाराज आपल्या असंभवनीय कर्तृत्वाविषयीं कांहीं बोलावेंसें वाटत नाहीं. कैदी तर केलेंच आहे आतां न्यायासनासमोर सत्य न्याय मात्र करवा ह्मणजे झालें.

रास०–तूं माझा हेवा करतोस हें बरें नाहीं, ह्मणून तुला विचारतों कीं, शारंगप्रभेस तूं कोणीकडे ठार मारलीस? खरें सांग.

धन०–मला शारंगप्रभेविषयीं कांहीं माहिती नाहीं.

रास०–तूं तिला सांगितलेंस कीं सत्यसेनास वरूं नको. आणि मजबरोबर अमर्यादपणानें वागून मला उपदेश करित होतास, त्याचें स्मरण झालें ह्मणजे असें वाटतें कीं, तुझा प्राण घ्यावा कीं माझा प्राण द्यावा सांग बरें! कां कांहीं बोलत नाहींस? शारंगप्रभा कोणीकडे पळून गेली?

धन०–(कपाळास हात लाऊन) प्रारब्ध माझें! मला मुळींच माहीत नाहीं ह्मणून सांगत असतां हा मला पुनःपुनः तेंच तेंच विचारतो हें काय?

रास०–मला माहीत नाहीं ह्मणतोस? हूं, आतां दाखवितों कशी माहिती नाहीं ती. (शिपायास) काय बघतां, यांना गाडींत न बसूं देतां पायानींच चालवा आणि तुह्मींही त्यांच्याबरोबर चाला; समजलांत,?

राम्या०–महाराज आमचे घोडे?

रास०—चालतील तुमच्या बरोबर (नंतर घोड्याच्या लगामा एका हातांत व दुसऱ्या हातांत एकेक कैदी केलेले इसमांसह निघून जातात)

---

## अंक ५ वा.

---

### प्रवेश १ ला.

दरबार—न्यायसभा.

कांतिवर्मराजा—सुशर्मा (प्रधान)—भानुसिंग(सेनापती)—श्रीनिवासराव (न्यायाधिश)—विठूजी ( चोपदार )—रासगुप्त (राजघराण्यांतील मुलगा) राम्या, येसू, धोंडी, (शिपाई)-धनपाळ (सावकारपुत्र)—कैदी—रामचंद्रपंत कारकून—तुळाजी गडी. संतू गाडीवाला (कैदी.)

विठु०—सकलगुणकलाप्रविण आर्यभूषण, श्रीमंडित राजाधिराज कांतिवर्म राज्यपालकाचा जयजयकार असो—(पडदा वर जातांच सर्व उठून अनुक्रमें मुजरे करूं लागतात.)

विठू०—प्रजापालकास, गुणी, ज्ञाते, योध मुजरे करतात, त्यांकडे महाराजांचें अवधान असावें.

सुश०—ज्या त्या कारणावरून महाराजांचें मन उद्विग्न झालें आहे. त्याचे कर्ते राजाश्रयांत असून इच्छीत मनोरथ भंग होऊन निरिच्छ वागणें भाग पडणार. त्याला उपाय काय करावा?

श्रीनिवास०—आपण राजभूषण आहां आणि आह्मांस विचारतां तर सांगणें भाग पडतें कीं, अपायास उपाय शांती, आणि ती तर मूर्तिमंत राजाश्रयास आहे. मग अन्याय कसा होईल?

सुश०-आपण न्यायी आहां. आज्ञा असल्यास हुकूम करतों.

कांति. रा०-काय.? सांगितलेल्या इसमास आणलें?

सुश०-होय, राजमुगुटमणे काल चंद्रोदयीं धाकट्या महाराजांनीं त्यांस धरून आणलें आहे. आज्ञा असल्यास दरबारांत आणवितों.

कांति०-मग विलंब कां?

सुश०-विठूजी, बाहेरल्या बाजूस कैदी आहेत, त्यांस येथें आण.

विठू०-आज्ञा महाराज, (धनपाळाची बिडी काढून घेऊन येतो त्याच्या बरोबर रामचंद्रांत, तुळाजी, व संतू हेही येतात व सर्व कैदी मुजरे करून हात जोडून उभे राहातात.)

रास०-(मुजरा करून) या गुलामांनीं गाडींत बसून गरीब बैलांस धांवण्यास लाऊन आपण पळण्याचा विचार केला. तेव्हां या वीरपुरुषानें (छातीस हात लावून) धांवत जाण्याचा विचार केला परंतु हे हातीं लागेनात. मग घोड्यावर बसून राजा झालों; तेव्हां हे (कैद्यांस दाखवितां) चौघे कैदी झाले.

कांति०-पुरे आतां तुझें शहाणपण, गप्प बैस.

सुश०-(धनपाळास) मुला, येथें उभा रहा. (राजासमोर उभा करतो)

श्रीनिवास-कायरे! तुझें नांव काय?

धन०-(नम्रतेनें) मला धनपाळ ह्मणतात.

श्रीनि०-तुझ्या बापाचें नांव?

धन०-हिंमतराम.

श्रीनि०-तूं हिंमतरामाचा मुलगा?

धन०—होय महाराज.

श्रीनि०—( प्रधानाप्रत इकूच विचारतो ) हा कबूल करतो किंवा नाहीं.

सुश०—( नाहीं ह्मणून मान हालवितो )

श्रीनि०—कां धनपाळा, खरें सांग कीं, या कृत्याबद्दल तुझ्या बापास कांहीं माहिती आहे काय ?

धन०—( मनाशीं ) कांहीं तरी अघटीत आहे खरें. कारण, आतां आपल्या कुलशीलाचा अभिमान न राहतां सर्वांची विटंबना होणार! असो! ईश्वरेच्छेपुढें उपाय नाहीं. ( उघड श्रीनिवासरायास ) कोणत्या कार्याविषयीं विचारतां महाराज ?

भानुसिंग—( मध्येंच ) हा देखणा दिसतो; यामुळें सर्वांस दया येते. परंतु हा पक्का बिलंद आहे. ( श्रीनिवासरायास ) कसें उत्तर देतो पाहिलातना !

श्रीनिवा०—ह्या कार्याविषयीं ( पत्र देतो तें वाचून धनपाल खेदी होतो ) कोण आहे रे ?

गडी०—जी महाराज.

श्रीनि०—या तिघांस बाहेर न्या, ( शिपाई बाहेर नेतात व धनपाळास) बोलत कां नाहींस ?

धन०—न्यायसभेपुढें सत्यास जय असें कल्पून जें बोलेन तें सर्व खरें मानणें अन्नदात्याकडे आहे.

श्रीनिवा०—( गंभिरतेनें ) होय, हें सर्व आह्मीं जाणतोंच. पुढें.

धन०—( नम्रतेनें दोन्ही हस्त जोडून ) राजेंद्र, हा देह आपल्याच अन्नानें थोर झाला आणि ह्यानें बाल्यदशेंत आपल्याच विद्यालयांत विद्याभ्यास केला, त्याचें फळ केवळ कुकर्म

आणि कुसंगती, घातपात किंवा दुष्ट इच्छा होईल काय?

श्रीनिवा०–अरे या तुझ्या पत्रावरून अवटीत बुद्धि सहजच सिद्ध होते. यापुढें तुझें कांहीं बोलणें आहे?

धन०–(खिन्न होऊन राजास) आपण माझे पालक आहांत.

कांति०रा०–को बरें, हें पत्र तुझें नाहीं ह्मणतोस?

धन०–असत्य कसें बोलूं महाराज.

कांति० रा०–तर सांग आतां, ती पोरगी कोठें आहे?

धन०–राज्यपालकांनीं असें न विचारण्याविषयीं सेवक करद्वय जोडून प्रार्थना करित आहे.

श्रीनिवास०–(रागानें) सांगण्याचा विचार नाहीं वाटतें?

धन०–(दीनतेनें) शारंगप्रभेविषयीं मला कांहीं माहित नाहीं.

श्रीनिवा०–(राजास) महाराज, अशा रीतीनें हा सांगणार नाहीं (धनपाळास) तूं त्या बाजूस उभा रहा; (तो निमुटपणें दाखविलेल्या जागीं उभा रहातो व सिटूजीस,) बाहेरल्या दुसऱ्या कैद्यास आण, (रामचंद्र कारकुनास पुढें आणून उभा करतात) तूं कोण आहेस?

राम०–मी ब्राह्मण आहें महाराज.

रास०–(मध्येंच) अरे, असें खोटें बोलतोस? तूं (धनपाळाकडे बोट दाखवून) व तो समोरासमोर बसले होतेत, त्यावेळेस गादीच्या खालीं मला खंजीर दिसला, तो हा पहा. (खंजीर न्यायाधिशापुढें टाकतो.)

श्रीनिवास०–कांहो रामचंद्रपंत, तुह्मी ब्राह्मण, आणि हें महाराज ह्मणतात हें काय?

राम०-महाराज कांहीं ह्मणोत, मी तर गरीब ब्राह्मण आहें.

श्रीनिवा०-पेत, श्रीमंतीकरितां द्रव्यलोभानें शारंगप्रभेस मारली काय !

राम०-(दोन्हीं कानांवर हात ठेऊन) शिव! शिव! आमच्या हातून असें साहस होईल तरी कसें ?

श्रीनिवा०-सर्वांविषयीं बोलूं नका. कदाचित तुह्मीं केलें नसेल; परंतु हें कर्म तुमच्यापैकीं कोणी केलें किंवा नाहीं ? खरें सांगा ?

राम०-महाराज, मी पूर्व दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास आलों आणि सूर्योदयीं निघालों, मला यांत काय माहीत असणार ?

श्रीनिवा०-तर, तुह्मांला कांहीं माहित नाहीं ना !

राम०-यज्ञोपवीताची शपत, मला कांहीं माहित नाहीं.

श्रीनिवा०-(पत्र रामचंद्रांताच्या हातीं देऊन) तर आतां हें अक्षर कोणाचें आहे ! खरें सांगा ?

राम०-(पत्र घेऊन धनपाळाचें अक्षर ओळखून घाबरतो व स्तब्ध राहतो.)

श्रीनिवा०-कां ! बोलत कां नाहीं ? ओळखीचें नसल्यास सही वाचा.

राम०-मला खोटें बोलणें नाहीं. हें सुवाच्य अक्षर आमच्या शेटजींचें आहे.

श्रीनिवा०-तुमच्या शेटजींस आह्मीं ओळखीत नाहीं. काय तें नांव सांगा.

राम०-धनपाल.

श्रीनिवा०-ते येथें आहेत काय?

राम०–हे महाराज, (धनपालास हातानें दाखवितो.)

श्रीनिवा०–रामचंद्रपंत, आह्मांस ह्या खटल्यासंबंधीं जी माहिती पाहिजे होती, ती तर मिळालीच आहे. परंतु तुह्मांला जर आपल्या कुटुंबांत सुखानें राहण्याची इच्छा असेल तर शारंगप्रभेचा शोध सांगा!

राम०–महाराजांस पूर्वीच शपथ वाहून सांगितलें कीं, मला कांहीं ठाऊक नाहीं. यापुढें आपण सत्ताधीश आहांत, जी शिक्षा करणें असेल ती करा.

श्रीनिवा०–तुमच्या प्रारब्धीं दुःख, त्याला माझा तरी काय उपाय? आतां तुह्मी तुमच्या शेटजींजवळ उभे रहा. (तो तसें करतो. विठूजी तुळाजीस आणतो, त्यास पाहून) अरे हा तर आपल्या विठूजीचा मुलगा ना?

तुळाजी०–होय महाराज.

श्रीनिवा०–अरे, तुझा बाप इतका म्हातारा झाला, तरी प्रामाणिकपणानें महाराजांची नौकरी करतो आणि तूं विरुद्ध गोष्टीस अनुमोदन देऊन अघटीत कृत्य केलेंस काय!

तुळा०–नाहीं महाराज.

श्रीनि०–तर काय तुला येथें उगाच आणलें आहे?

तुळा०–महाराजांनीं आज्ञा दिल्यास माझा अर्ज आहे.

श्रीनि०–काय अर्ज आहे! बोल भिऊं नको. अन्य ठिकाणीं तुझा बाप तुला नौकरी देईल. पण खरें सांग काय तें!

तुळा०–हुकूम आहेना?

कांति०–होय, बोल उशीर नको.

तुळा०–(धनपाळाकडे पाहून) मी ह्या शेटजींचा नौकर आहें. परवांच्या दिवशीं वाढदिवसामुळें रात्रीं जागरण झालें

व दुसऱ्या दिवशीं सकाळीं धन्याबरोबर गाडींतून जात असतां.— ∴

श्रीनि०—मी तुला परवां तेरवांचें विचारीत नाहीं.

तुळा०—तर महाराज आपण काय विचारतां.

श्रीनि०—(त्यास पत्र देऊन) हें तुझ्या शेटजीचेंच अक्षरना?

तुळा०—(पत्र पाहून) होय महराज.

श्रीनि०—(दटावून) तर गुलामा, खरें सांग राजकन्या कोणीकडे आहे ती?

तुळा०—(भिऊन) मला माहित नाहीं. पण रात्रीं मात्र·

श्रीनिवा०—कां? रात्रीं मात्र, इतकें ह्मणून स्तब्ध राहिलास? बोल लवकर, आह्माला पक्का शोध लागला आहे. तूं खरें बोलशील, तर सुटका होईल नाहीं तर शिक्षेस पात्र होशील समजलास.

तुळा०—(मनांत) अरे! रे! सर्वस्वीं घात केला! असो; (उघड) महाराज, रात्रीं मात्र इतकें ह्मणून स्तब्ध रहाण्याचें कारण असें कीं, हें पत्र शेटजीनीं जन्म दिवसाच्या मध्य रात्रीस राजकन्येस देण्यास दिल्याचें मला स्मरण आहे.

श्रीनिवा०—मग तूं हें पत्र शारंगप्रभेस देऊन तिला फसवून नेलेंस खरें ना?

तुळा०—मी स्वतः हें पत्र दिलें नाहीं.

श्रीनिवा०—तर आणखी कोणी यांत सामील आहेत वाटतें, खरें सांग?

तुळा०—सामील कोण असणार? मी स्वतः पत्र घेऊन बुर्जाजवळील देवडीवर उभा होतों; त्यावेळेस राजकन्येच्या दासीस हें पत्र दिलें आणि प्रातःकाळीं आह्मीं भद्रावतीस निघून गेलों.

श्रीनिवा०—आह्मांला असा शोध लागला आहे कीं, द्रव्य लोभानें शारंगप्रभेस मारून द्रव्य पुरून ठेवलें आहे.

तुळा०—महाराज, शेटजी गर्भश्रीमंत असून असें काम कसें करतील ?

श्रीनिवा०—कदाचित् शेटजीनीं केलें नसलें तथापि तूं केलें असल्यास ?

तुळा०—महाराज, मी त्या रात्रीस तिला पाहिलें असल्यास ईश्वर माझे डोळे नाहींसे करील; फार काय सांगूं, आपण आमचे धनी आहांत पाहिजे तें करा.

श्रीनिवा०—तर हा खंजीर तुझा आहे?

तुळा०—नाहीं महाराज.

श्रीनिवा०—मग हा गाडींत कोठून आला ? आणि याला रक्त कसें लागलें ?

तुळा०—हें शस्त्र रासगुप्त महाराजांनीं गाडींतून आणून दाखविलें यावांचून मला कांहीं ठाऊक नाहीं.

श्रीनिवा०—ठाऊक नाहीं काय? बरें समजेल! आतां तूंही तेथें उभा रहा. (तो दोषांसन्निध उभा राहतो व विठूजी संतूस आणतो, त्यास पाहून ) तूं कोण ?

संतू०—मी गाडी हांकणारा ?

श्रीनिवा०—बरें गाडींतून यांस ( तिघांस दाखवितो ) कोठें घेऊन जात होतास ?

संतू०—शेटजीच्या घरून या तीन इसमांस भद्रावतीच्या रस्त्यानें घेऊन जात असतां हे ( रासगुप्तास दाखवितो ) राजश्री यानीं मला बळेंच कैद करून आणलें. मला दुसरें तिसरें कांहीं ठाऊक नाहीं.

**श्रीनिवा०**–तर तुझ्या गाडींत हा रक्तानें भरलेला खंजीर कोठून आला?

**संतू०**–महाराज, शेटजींच्या बैलास पराणी लावण्याचा हुकूम नाहीं; मग गाडींत हत्यारें कोठून असणार?

**श्रीनिवा०**–पुरे पुरे तुझें शाहणपण. आतां गप्प रहा. (राजास) महाराजा समक्ष चौकशी झाली; आतां काय आज्ञा होत आहे?

**कांति०**–(विचारकरून सुस्कारा टाकून) चौकशी करतां इतकें सिद्ध होतें कीं, हें सावकारपुत्राचें स्वदस्तुरचें पत्र आहे व साक्षीदारांनीं ज्या आपल्या जबान्या दिल्या, त्यांवरून धन्यावर सबळ पुरावा होत नाहीं, व मुलीचाही शोध सांगत नाहींत, त्यामुळें तिला मारली, किंवा ती जिवंत आहे हें कांहींच समजत नाहीं. आतां तिला वाईट बुद्धि देऊन द्रव्य लोभानें पळविली हें पत्राच्या पुराव्यावरून सिद्ध होतें असें समजून विशेष चौकशी होण्यास जेरबंदांनीं मारून कबूल झाल्यास अपराधाची क्षमा करावी, व तिघां कैद्यांस साक्षी ठरवून सोडून द्यावें, आणि काम पडल्यास हजर होऊं अशा रीतीचे स्वदस्तुरचे मुचलके लिहून घ्यावे.

**श्रीनिवा०**–जशी महाराजांची आज्ञा. (सेवकास) काय राजाज्ञा झाली ऐकलीतना?

**सेवक०**–होय महाराज (धनपाळास बंदीवान करून बाकीच्या तीन इसमाचे मुचलके घेण्यास घेऊन जातात.)

**सुधा०**–क्षमा, दया, शांति, आणि ज्ञान यांचें मूळ बीज विद्या, ती जर योग्य कामीं खर्च केली तर लोकापवाद न येतां स्तुति होते. आतां महाराजांनीं अपराध्यांस अपराध कबूल केल्यास क्षमेचा भाव दाखविला; परंतु तसें न झाल्यास

पुढें हुकूम काय होतो तो दासास समजला नाहीं.

श्रीनिवा०—महाराजांस प्रधान खरेच चतुर मिळाले, यांत संशय नाहीं.

कांतीव०—कां श्रीनिवासराव पुढल्या हुकुमास तुमचें मत कसें काय आहे तें तर समजू द्या.

श्रीनिवा–प्रजापालकांनीं न्याय तर यथा योग्य केला. परंतु अपराधी स्वदस्तूर कबूल करून कर्तृत्व छपवितो. कारण, खंजिराच्या सबल पुराव्यावरून द्रव्य लोभानें मारली असावी असें वाटतें तर यथा न्यायानें पाहूं गेलें, तर अपराध्याची शहरभर धिंड काढून देहांत प्रायश्चित द्यावें. यावांचून दुसरें मला कांहीं वाटत नाहीं. याउपर महाराजांची मर्जी.

कांतिवर्म०–( सर्वांस ) कां सभासदहो, आतांच न्यायाधीशांनीं जें भाषण केलें हें सर्वांनीं ऐकलेंच आहे; याउपर तुमचे हेतू मला समजले पाहिजेत.

सुश०–( सर्व एकमेकांच्या कानीं लागून प्रधानास सांगतात त्यावरून ) महाराज सर्वांचें बोलणें न्यायाधीशाच्या बोलण्यास अनुसरून आहे. तर आतां काय ती आज्ञा व्हावी.

कांति०–( दुःखानें ) मंत्री, आज कैद्यास देहांत शिक्षा दिल्यानें माझी प्रीयकन्या मला भेटून आनंद होतो असें नाहीं, परंतु अन्यायास न्याय देणें हा पक्ष मजकडे आहे ह्मणून निरूपायास्तव व न्यायाधिशांच्या बोलण्यांस रुकार देणें भाग पडतें.

सुश०–कोण आहे रे तिथें !

भानु०–जी महाराज.

सुश०–मारेकऱ्यांस वर्दी कळीव कीं, हिंमतराम सावका-

राचा पुत्र धनपाळ, यास जेरबंदानें मारून अन्याय कबूल न केल्यास राजआज्ञा भंग करून द्रव्य लोभानें राजकन्येस वाईट वर्तणूकेचे विचार देऊन रानांत ठार मारल्याच्या स्वदस्तुचा आणि रक्तांनीं भरलेल्या खंजिराच्या सबळ पुराव्यावरून उद्यां प्रातःकाळीं सर्व शहरांत धींड काढून सूर्य मध्यानींस सूळीं द्यावा. व शहरवासी जनांस कुकर्माचें फल पाहण्यास सर्व शहरांत दौंडी द्यावी अशी राजाज्ञा आहे ह्मणून कळीव, जा.

भानु०–हुकूम आहे नां महाराज,?

सुश०–होय जा तूं.

---

## प्रवेश २ रा.

### चावडी.

राजदूत, कैदी धनपाळ, रासगुप्त, भानुजी हुजऱ्या, सैन्या.–

**रास०**–[धनपाळास जेरबंदानें मारण्यास घेऊन येत आहेत असें पाहून] अरे, ह्या सावकाराच्या पोरास जेरबंदानें मारण्यास मोठ्या आनंदानें मारा, मारा, असें बोलत राजदूत धांवत किती येत आहेत. अबबब (आश्चर्य करून) हा माझ्या सारखा श्रीमंत नाहीं, याला सावकारी कशी करावी हें ठाऊक नाहीं, हा राजा नाहीं, जिभेनें पाहिजे तें बोलतो ह्मणून सर्व शहरवासी लोक ह्याला शाहणा ह्मणतात, परंतु मला तर याच्यासारखा महामूर्ख जगांत आढळत नाहीं. असें असून याच्या देहाचें महासौंदर्यवान चार जवान राजासारखें रक्षण करितात हा केवढा अन्याय, कारण कीं यास पाह-

ण्यास लोक तरी किती आले आहेत ! आणि मी राजा, माझा मित्र सत्यसेन प्रधान, या उभयतांस (धनगुप्तास कैदी केलेले दाखऊन) अशा रीतीनें महाराजांस पाहण्यांस सर्व लोकांच्या गाड्याघोड्यांच्या झुंडीच्या झुंडी आणि आकाशांतील पशुपक्ष्यांचे थवेच्याथवे उलथून पडतील नाहीं बरें?

**संभ्या०**–जगांत न्याय नाहीं बरें, कारण एकाची ह्मण आहे कीं, विनाशकाले विपरीत बुद्धी, ती जर खरी ह्मणावी तर निरअपराध्यास दंड कां होता, व ज्यांस विपरीत बुद्धि उत्पन्न झाली असतां त्याची मनेच्छा पूर्ण कां न व्हावी (रासगुप्त) होय महाराज, आपली इच्छा इश्वर केव्हां तरी पूर्ण करील.

**मांग०**–(धनगुप्तास मारण्याकरितां एका हातांत कोरडा घेऊन) अर ये सावकार, समुब्द वस्तूर, मुंडास काढ बीगी.

**धन०**–(धैर्यहीन होऊन डोळ्यांत अश्रु येतात) हर, हर, जितका जगांत न्याय तितकाच अन्याय ना? अरेरे, जे मजवर अत्यंत प्रेम करीत होते त्यांस आज मी जगांत दुष्टासारखा वाटून माझ्या बोलण्यावर अविश्वास झाला (विचारकरून) धैर्यवानास साधू ह्मणतात ह्मणून इतका वेळ धैर्य धरलें परंतु व्यर्थ झालें. मी अल्पमतीनें साधू ह्मणालों परंतु ज्यानीं साहा धुतले तो साधु आणि मी तर दुष्ट, परंतु दुष्ट क्रिया केली नाहीं, पातकी असूनही अपराधी नाहीं.

**रास०**–तूं अपराधी नाहींस तर मी, आणखी काय?

**मांग०**–(धनगुप्तास) अर वस्तुर काढ, ऐकतो कीं न्हाई.

**धन०**–(हात जोडून दीनतेनें) काढतों बाबा, (भयभीत होऊन आंगरख्याचे बंद सोडूं लागतो) माझ्यावर प्रसंगच आहे ह्मणून तुमची विनवणी करतों कीं कोरड्यानें न मारतां

माझा जीव घ्या, परंतु ही यमयातना माझ्यानें सहन हो-णार नाहीं, तुमच्या पायां पडतों. (साष्टांग दंडवत घालतो)

मांग०–(दयार्द्र होऊन त्यास उभा करतो) आमीबी मनु-ष्यच हावो, आमास्नीबी दया हाई पर तूं कबूल हो मजी आमास्नी माराया नग, बोलकीर मर्दा. मजी तुजीबी सुट-का व्हईल.

धन०–(कपाळास हात लावून) प्रारब्धच माझें ओढावलें त्याला तुमचा तरी काय उपाय, जो सर्वभूतीं आहे तो अलीप्त असल्यामुळें त्यास साक्ष देतां येत नाहीं, काय करूं मी, मजवर कृपाकरून माझी तनु छिन्न भिन्न करणार त्यापेक्षां शस्त्रप्रहारानें अंत करून तनु प्रजापालकास दाखवा ह्मणजे महत् उपकार केल्यासारखें होईल. (भोगरखा पागोटें काढून उघड्या आंगानें उभा राहतो.)

मांग०–अर संमद खर हाई, पर आमी हुकमाच चाकर ह्मनून सांगतोया बीच्या सरकारची लेक हैय कुनीकड.

धन०–(रडत) मला माहीत नाहीं, खचित माहीत नाहीं. (इतक्यात कोरडा मारतो त्याबरोबर कळवळून मोठ्यानें ईश्वरा फोडून जमिनीवर पडतो, त्यास उठीवतात व पुन्हा पुन्हा कोरडा मारतात.)

मांग०–कुनीकडे हाई बोल झटदिशीं. (कोरडा मारतो)

धन०–(गडबडा लोळतो) आग आई आई अयययय अबबब, मेलोंरे मेलों मेलों मेलों मेलों (उभा करतात.)

मांग०–कुनीकडे हाई.

धन०–अरेरे माझ्या आंगातून रक्त आलें, माझ्यानें बोलवत नाहीं, मी तुमची व ईश्वराची शपत घेऊन सांगतों.

मांग०–सांग सांग लवकर.

धन०–मला ठाऊक नाहीं मी खचित्त पळवली नाहीं,

पाहिजे असल्यास माझा जीव घ्या पण मला मारूं नका. (इतक्यांत भानुजी हुजऱ्या येतो)

भानु०—अरे तुमाली वर्दी हाई.

मांग०—कायर.

भानु०—अरे हिंमतराम सावकाराचा लेक धनपाळ यास जेरबंदानीं मारून अन्याय कबूल न केल्यास राजआज्ञा भंग करून द्रव्यलोभानें राजकन्येस वाईट वर्तणूकीचे विचार देऊन रानांत ठार मारल्याच्या स्वदस्तूरच्या आणि रक्तानी भरलेल्या खंजिराच्या सबळ पुराव्यावरून उद्यां प्रातःकाळीं सर्व शहरांत धींड काढून सूर्य मध्यानींस सुळीं द्यावा व शहरवासी जनांस कुकर्माचें फल पहाण्यास सर्व शहरांत दौंडी द्यावी अशी राजज्ञा झाली आहे समजलांत.

मांग०—(त्रासून) ऐकलेंसरे बीऱ्या आतां तुझे घडे भरले चल (येऊन जातात.)

रास०—कशी गमत झाली शाबास शाबास (आपलीच पाठ आपणच थोपटतो.)

संभ्या०—वः महाराज धन्य आपला पुरुषार्थ (सर्व जातात.)

---

## प्रवेश ३ रा.

### रामोशाचें घर.

मन्या, सुभान्या, सदबा, ग्यानबा, शारंगप्रभा, आणि कोंडीबा महार.

(प्रभातकाळीं धोंडी निवारणार्थ आग्टीजवळ भग पेत बसले असतां)

मन्या—कायराव ग्यानबा, तुमावानी शान सुरत कोनीची न्हाइ बगा. (शारंगप्रभेस दाखवून) ही माझी बगा तवांच बरी झाली राव.

सुभा०–अवो तेत नवल न्हाई पर येचा बापबी लई हुशार त्येच्यां वानीं कुनीबी न्हाई.

शारंग०– (आंगावर घोंगडी घेऊन) तें बाई कांहीं असो, पण मी वांचेन असें माझ्या स्वप्नींहीं नव्हतें; तुम्हीं चार दादाबाबानीं रानांतल्या वन औशधीनें मरणाच्या तोंडातून काढलें हेंच ईश्वरानें मजवर केव्हढे उपकार केले बरें, ह्मण आहे ना? कीं तारत्या पुढें मारत्याचें कांहीं चालत नाहीं, असें समजून सत्य भाषण, सत्य धर्माचें आचरण, हेंच विद्येचें फळ ह्मणून मला सुख वाटतें.

कोंडीबा०–(मार्गानें जातांना) जोहार करतोया मन्याबा

मन्या०–कोनरे त्यो, कोंडीबा?

कोंडीबा–जी, मी हाये.

मन्या०–आज काय हाईर, लई बीगी बीगी, कुनी हाइ जनू?

कोंडीबा-लैई दिवसान मूडास मिळायचा योळ आला हाई अनिक काय राव!

मन्या०–आनी ते कशा पाई र?

कोंडीबा०–मन्याबा, त्यो आपल्या गांवचा सावकार हिंमतराम नव्हका! त्येचा लेक धनपाळ त्यास सुळी देयाचा हाई,

मन्या०–त्येनी सरकारचा गुन्हा का केला हाईर?

कोंडी०–आव आपल्या सरकारची लेक शारंगप्रभा (शारंगप्रभा चपापती) तीस पैक्या पाई रानामंदी मारली ह्मनुनशेनी त्येस्नी शहरामंदी धींड काढून सूळी देयाचा हाई त्यापाई भाकर तुकडा बीगी बीगी खाऊन निघालों पगा, (जाऊं लागतो) जोहार करतो (निघून जातो.)

सुभान्या०—कायर मन्याबा त्यो गोरासा सावकाराचा ल्योक नव्हका ?

मन्या०—होय बिल्या, आपनास्नी पंचाइत कशालार व्हांवी ?

शारं०—( मनाशींच ) काय बाई अनर्थ, या महारानें जें सांगितलें तें खरंचसं वाटतं बिच्याऱ्या गरीबास सूळीं द्यायचा हा केव्हढा अन्याय ह्मणायचा, ज्या मेल्यान मला जखम करून काटेरी झाडांत टाकून गेला, त्याची तर चौकशीही केली नाहीं, काय बाई न्याय हा, देवा तुझी मी फार आभारी झालें. मी जर मरतें तर गरीब सूळीं जाताना ? काय करूं तरी आतां ! ( विचार करून ) जर घरीं मी दुखण्यांत पडतें तर वैद्य, मंत्री, धूर्त, जोतिषी, यांची चंगल उडून द्रव्य लोभानीं त्यानीं इतकी लवकर बरी कधींच केली नस्ती, आतां जरा बरें वाटूं लागलें तोंच हें विघ्न पुढें ओढवलं आणि न गेलें तर निरपराधी धनपाळ मजकरतां जगांतून नाहींसा होणार, बरं कदाचित मला मारल्याचा अपराध धनपाळानें कबूल केला असेल असं जर ह्मणावं, तर तो खोटें बोलणार नाहीं असें असतां, हीं गोष्ट झाली तरी कशी? हो ! सत्तेपुढें शहाणपण नाहीं हेंही खोटं नाहीं, त्यास जूलमानें बाबा सूळीं देत असेल किंवा त्या दुष्ट घातकी सत्यसेनानें आणि रासगुप्तानें त्याच्यावर आरोप शाबीत करून जगांतून नाहींसा करण्याचा घाट रचून त्याला सूळीं देणार ( विचार करते ) बाई आतां माझी सुटका येथून होणार तरी कशी ( रामोशास उघड ) बाबानों आजचा तीसरा दिवस, मी आतां बरी झालें ह्मणून तुह्मांस सांगतें कीं तुह्मी माझ्यासाठीं पुष्कळ कष्ट केलेत पण त्याचं

फल मज अबले पासून न मिळतां उलटें दुःख देतें त्या अपराधाची क्षमा करा, मी पदर पसरतें पांया पडतें.

मन्या०–बया, तुझ्या पाई आह्मांस्नी काईबी दुःख नाई.

शारं०–तुह्मीं ह्मणता खरं पण आतां तुह्मां सर्वांस दुःख देणारी, मी.

मन्या०–दे बये, माझी लेकच तू हाईस, आणिक काय सांग की.

शारं०–बाबानों मी पुष्कळवेळां सुळावर देतात ह्मणून ऐकलें आहे पण अद्यापी मनुष्यास सुळीं देतांना पाहिलें नाहीं जर मज अबलेवर दया करून न्याल तर माझ्या दृष्टीस तरी पडेल.

संभ्या०–खर बये, तूं जर जातीस तर आपूनबी तयार हावोंत.

मन्या०–तूं तर लेका तयार हाईस, परहीं माझी बया दुःखती खुकतीया आनिक वायूबियू झाला मजीरे ?

ग्यान०–आनराव मीबी हाई थीत, आपनापासीं संमद दव हायती, बया भिऊ नग, बर.

सुभ्या०–ग्यानबान् जस भरसपंती हायती.

शारंग०–मी सर्व जाणतें पण आतां उजाडलं जायचं ना?

सदव०–तुमीबी मन्याबा अस राव काय करतां आपून संमद जाऊं मजी आपली बया पगील चला कीं.

मन्या०–तुमी संमद बिव्या ह्मंगता आनीक माजी बयाची तयार हाई मग मीबी न्हाई कशाल्ली ह्मंगु तुमीबी पघाल आनीक बयेलाची दिसल, चलाकीर मर्दोहो,

(सर्व नीघून जातात.)

## प्रवेश ४ था.

### राजमार्ग.

धनपाल,–राजदूत, दौंडीवाला, शारंगप्रभा, रामोशी, राजा, सेवकजन, वगैरे.

दौंडी०–( रस्त्यांत मोठ्यानें ) ऐका हो संमद लोकहो, हिंमतराम सावकाराचा ल्योक धनपाल येनीं वाईट वर्तणूकेचा इचार देऊन दर्व लोभानें राजकन्येस रानामंदी ठार मारल्याच्या स्वदस्तुरचा आणि रकुतानी भरलल्या खंजिराच्या सबल पुराव्या वरन आरोपीस कुकर्मासाठीं राजाज्ञा तोडल्यामुळें जेरबंदानी मारून अपराध कबूल न झाल्यास सकाळी सरव शहरांत धींड काढून सूर्य मध्यानींस सूळी द्यावा अशी परजापालकाची आज्ञा झाल्यावरून शहराभाहीर सूळावर देण्यास न्हेतो हायेंत, तर समंद्यानीं कुकर्माच फल बघण्यास यावं ( दौंडी वाजविती इतक्यात माग धनपाळास रक्तवस्त्र रक्तपुष्पमाला दंडास काढण्या बांधून हातांत नग्नशस्त्रें घेऊन येनात)

धन०–( दुःखानें ) विश्विशा, दया, क्षमा, शांति, यांचा कळस होऊन निरुपद्रवी प्राणी दुःसह दुःखांत टाकून अन्यायानें क्षणांत जगांतून नाहींसा करणें हें तुला प्रीय आहे असा भास खऱ्या रीतीनें सांगण्यास कोणी प्राणी धजेल असें मला वाटत नाहीं. आतां मी मात्र क्षणैक ज्ञानानें तुला दोष देतों कीं अपराध्यास शीक्षा न देतां अन्यायानें मजवर हा केव्हडा प्रसंग कीं जो मला दुःसह होतो. काय करूं हे देवाधीदेवा अहीमहीनें रामचंद्रास त्याच्या बंधूसह आपल्या देवीस बळी देण्याकरितां ज्या सामोग्रीनें सुशोभित केलें होतें, त्याच भुषणानीं हा पापी अ:-

पर्ले नीत सत्य करण्यास शरीरावर अलंकारांचें रक्षण करीत आहे. (शहरवासी लोकांकडे पाहून) हे सर्व शहरवासी जन यज्ञ पाहाण्यास किती आतुर झाले आहेत, जसा यज्ञपशूचा वध होऊन याग साफल्य झाल्याचा पुण्यांश मानून आनंद करितात तशी या संपूर्ण आर्यजनांची स्थिति झाली आहे. त्यामुळें प्रजेच्या राजभक्तीप्रदर्शक चिन्हांवरून मी राजद्रोह्यासारखा दुतर्फा लोकांच्या थव्यांतून मती भयभित करणाऱ्या भूषणांसह निर्लज्यतेनें चालत आहें. माझ्या चरणांस जडत्व आल्यामुळें ही आर्यमाता माझेच चरण भक्षण करण्याचा विचार करीत आहे कीं काय असें वाटतें. माझा देह विदारण होणार ह्मणून कंपायमान होत आहे. बलिवत मस्तकावर व शरीरावर विं पतेस्तव सिंदूर टाकल्यामुळें शरीर लाल होऊन शरीरांतील रक्त अंतकाल समजून आपलीं द्वारें बंद करून मस्तकीं जाण्याच्या क्रमानें नेत्रांस आरक्तता आली, आतां माझ्या हातून स्वदेशहितास आणि वर्ग बंधूच्या साह्यास या जगांत अल्पायुषी जन्मून कांहीं सार्थक केलें नाहीं. हे सच्चिदानंदा, तुझी लीला, माया, मोह, धर्म व कर्तृत्वावरून कर्ता हीं जाणण्यास साधन जी विद्या तिजमध्यें जर मी निपूण असतों तर ही आर्यमही सुप्रसन्न करण्यास कांहीं आयुष्य खर्चि घातलें असतें, परंतु अल्पवयी उत्पन्न झाल्यामुळें उपाय नाहीं, ह्मणून अल्पायुषी उत्पन्न न करतां आर्यभूमिस दिर्घायुषी विद्वान जनापासून सुप्रसन्न करण्यास विद्याधन दे या वांचून माझें दुसरें मागणें नाहीं.

संभ्या०—(सर्व लोकांतून मोठ्यानें) अरे निर्दयानों, स्वजन मनोल्हादार्थ आर्यभूमिस दोष लावण्यास पुढारी कां होतां ?

गरीब बिचाऱ्या निरापराधी प्राण्यांस दुर्धर दुःख देऊन त्याचा प्राण हरण करण्यास तुह्मांस कांहींच भय नाहींना! अरे स्वदेशहितास सतत झटणाऱ्या अशा विद्वान सुशील लोकांस न्यायासनासमोर आणून आर्यभूमिचा उत्कर्ष न होण्याचा यत्न करतां हा केव्हडा अन्याय! आणि स्वतंत्रता दाखऊन गरीब अनाथ प्राणी सुळावर देतां, अन्यायरे अन्याय, काय करावें यांनीं लज्जा सोडली. लोकापवादाचें अथवा परराजाचें भय यांस मुळींच नाहीं; ह्मण आहे कीं, "एक लज्जां परित्यज्य सर्वत्र विजयी भवेत" याप्रमाणें हे बनलेच, आतां उपाय नाहीं काय करावें.

धन०–( लाबून सुळास वाहून ) देवा, विजेप्रमाणें प्रकाशित हें शस्त्र माझ्या आलिंगनाची इच्छा करीत आहे. ( इतक्यात भाग सुळाजवळ नेतात.)

शारं०–( दयार्द्र होऊन ) देवा काय हें अरिष्ट, बिचाऱ्यास उगीच जिवें मारतात, आतां जर मी उशीर करीन तर याचा ( धनपाळाकडे हातकरून ) जीव जाणार ( रामोशास सोडून धावण दृढालिंगन देऊन कंठांतील पुष्पमाळा तोडते, सर्वांस आश्चर्य वाटतें.)

शहरवासी लोक–( आनंदानें ) धन्य! धन्य! धन्य! धनपाळा धन्य; तुझ्या सारखा राजदंड भोगून अंतकाळ होईपर्यंत सत्यव्रत न सोडतां न्यायानें वागलास हेंच आह्मां प्रजाजनांस भूषण आहे. ( इतक्यांत राजास वर्तमान समजून सभानारूढ येतो.)

कांतिवर्म–कां बाळे तूं होतीस कोठें?

शारं०–( रडते ) बाबा, मेल्या सत्यसेनानें रानांत खंजिर मारून मला कांटेरी झाडांत टाकली तेव्हां या

(रामोशास) लोकांनीं मला आपल्या घरीं नेऊन बरी केली नसती तर मी मेलेंच असतें. (सुशर्मा चकित होतो.)

कांति०-प्रधानजी ऐकलेंतना? शारंगप्रभा काय ह्मणतें तें.

सुश०-होय महाराज.

कांति०-तर आतां विलंब न करतां आपल्या मुलास आतांच हजर करा.

सुश०-(खिन्न होऊन) आज्ञा महाराज, (सेवकास) कोण आहे रे?

विठू-जी महाराज.

सुश०-जा आणि सत्यसेनास बोलावून आण.

शारंग०-बाबा, बिचाऱ्या धनपाळास अन्यायान सुळीं देण्याचा विचार तरी दिला कोणी?

कांति०-बाळे शारंगप्रभे, याचा अंत होण्याचें कारण याचें स्वदस्तूरचें पत्र आणि खंजिर.

शारं०-हर हर! बाबा, मजविषयीं कोणावरही दोष येऊं नये ह्मणून मी आपल्यास एक पत्र लिहून माझ्या मंदिरांत आरशाच्या चौकटींत ठेविलं तें नाहीं का आपल्याला मिळालं?

कांति०--बाळे, काय ह्मणतेंस? मजकरितां तूं पत्र लिहून ठेवलें आहेस!

शारं०-होय बाबा.

कांति०-तें तर मला मूळींच मिळालें नाहीं.

शारं०-बाबा, कोणाला तरी पाठवून तें आणीव ह्मणजे तुला सर्व कळेल.

कांति०-(सत्यसेनास विठूजी घेऊन येतो त्यास पाहून.) वा!

सत्यसेना, माझें अन्न सेऊन मजवर योग्य उपकार केलास.

सत्य०—मी कांहीं केलें नाहीं, रासगुप्तानीं सांगितलें त्याला माझा तरी काय उपाय ?

कांति०—काय, आमच्या रासगुप्तानीं सांगितलें ?

सुश०—( सत्यसेनास उद्देश पाहून ) अरे भितोस कां जें पहिल्यानें नांव सांगितलेंस तेंच पुन्हां बोल.

सत्य०—होय महाराज, आपल्या रासगुप्तानें सांगितलें.

कांति०- विठूजी.

विठूजी०- जी सरकार.

कांति०—जा रासगुप्तास एकदम बांधून आण, आणि शारंगप्रभेच्या मंदीरांत आरशाच्या चौकटींत एक कागद आहे तोही लवकर घेऊन ये समजलास.

( विठूजी रासगुप्तास घेऊन येतो व शारंगप्रभेनें पत्र राजास देतो तें पाहून आनंदीत होत्साता शारंगप्रभेस पोटाशीं धरून )

कांति०—बाळे, धन्य आहेस तूं ! आज तुला मी शिक्षण देण्यास जे श्रम घेतले, त्यांचें सार्थक तूं फारच चांगलें केलेंस तुझें सद्वर्तन, या पत्रावरून सिद्ध होतें. ( तिला पुन्हा प्रेमालिंगन देतो व रासगुप्तास. )

कांति०—रासगुप्ता, तूं या सत्यसेनास शारंगप्रभेस पळऊन रानांत ठार मारण्यास सांगितलेंस काय ?

रास०—नाहीं नाहीं मी नाहीं; फक्त एक हिरजीचा कागद दिला.

कांति०—कोणास दिलास?

रास०—ममभित्र सत्यसेनास दिला.

कांति०—सत्यसेना, हा काय ह्मणतो याचा विचार केलास ?

सत्य०—महाराज आपल्या पायांची शपत घेऊन सांग-

तों कीं, रासगुप्तानें हिरजीस ठार मारून शारंगप्रभेचें पत्र मला दिलें. आणि पळऊन नेण्यास सांगितलें.

रास०—( मध्येंच ) गड्या तूं माझा जिवज्यान दोस्त असून खरें सांगतोसना? बरें मीहि सांगतों काका, मला एके दिवशीं रखमीनें कागद दिला तो यानींच (सत्यसेनास दाखवितो) मला सांगितलें कीं धनपाळाचें हें पत्र उद्यां काकास दे, मग धनपाळाची आपण गम्मत पाहूं. तशी मी गम्मत केली.

कांति०—तूं तर मूर्ख आहेस बोलूं नकोस, ( प्रधानास ) मैत्री, या खटल्याचा विचार फार बारकाईनें केला पाहिजे कारण यांच्या हल्लींच्या भाषणांवरून निरापराधी धनपाळ देहांत शिक्षेस जाण्यास कारण सत्यसेन व रासगुप्त उभयतां आहेत त्यांतून एकानें हिरजीस ठार मारला, आणि कन्या खंजिर मारल्याचा आरोप सत्यसेनावर करतें याकारितां उभय अपराध्यांस न्याय होईपर्यंत शृंखळाबंधन करून कारागृहांत रक्षण करावें समजलांत ( सेवक जनांस ) अरे पहातां काय या गुलामाना बांधा आणि कैदेंत ठेवा ( धनपाळास बांधलेल्यांत काढण्यानीं उभयतांस बांधून घेऊन जातात ) धनपाळा,

धन०—आज्ञा, प्रजापालका.

कांति०—या तुझ्या स्तुत्य कृत्याबद्दल ईश्वर तुला दिर्घायु ठेऊन तुह्मी परस्परांवर जसें प्रेम ठेवतां तसेंच तुमचें जन्मपर्यंत राहावें हीच माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे. तर आतां मनांत कांहीं एक दुःख न आणतां माझ्या कन्येचा प्रीतीपूर्वक स्वीकार कर आणि आनंदानें सर्व सुखाचा अनुभव घे.

समाप्त.